"ॐ श्रीपरमात्मने नम:"

# अथैकादशोऽध्याय:

## अवतरणिका

*दहाव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी अर्जुनावर विशेष कृपा करून म्हटले की, संपूर्ण जगत अर्थात् अनंत सृष्टी माझ्या कोण्या एका अंशामध्ये असतात, असा तो मी, तुझा सारथी बनलेला असून, तुझ्या घोड्यांचा लगाम आणि चाबूक घेऊन बसलो आहे; तसेच तुझ्या आज्ञेचे पालन करीत आहे. जर सर्व विभूती आणि योग (प्रभाव) याचा महान् आधार असलेला मी, तुझ्यासमोर बसलेला आहे; तर तुला वेगवेगळ्या विभूती जाणून घेण्याची काय आवश्यकता आहे ? ही गोष्ट ऐकून जेव्हा अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या अत्यंत महान् कृपेवर गेली तेव्हा ते मोठ्या आश्चर्यात पडले आणि एकदम म्हणाले—*

*अर्जुन उवाच*

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसञ्ज्ञितम्।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम॥ १ ॥***

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मदनुग्रहाय** | = केवळ माझ्यावर कृपा करण्यासाठी | **गुह्यम्** | = गोपनीय | **तेन** | = त्यामुळे |
| **त्वया** | = आपण | **अध्यात्म-सञ्ज्ञितम्** | = अध्यात्म-विषयक | **मम** | = माझा |
| **यत्** | = जे | **वच:** | = वचन | **अयम्** | = हा |
| **परमम्** | = परम | **उक्तम्** | = सांगितले | **मोह:** | = मोह |
| | | | | **विगत:** | = नष्ट झाला आहे. |

*व्याख्या*— **मदनुग्रहाय**—माझे भजन करणाऱ्यावर कृपा करून, मी स्वत: त्यांचा अज्ञानजन्य अंधकार नष्ट करतो (१०।११). ही गोष्ट भगवंतांनी केवळ कृपेला परवश होऊनच म्हटली आहे. या गोष्टीचा अर्जुनावर फार प्रभाव पडला, ज्यामुळे अर्जुन भगवंताची स्तुती करू लागले (१०।१२-१५) अशी स्तुती त्यांनी पूर्वी गीतेत कोठेच केलेली नाही. त्याच मुद्याकडे लक्ष वेधून अर्जुन भगवंताला म्हणत आहेत की, केवळ माझ्यावर कृपा करण्यासाठीच आपण ही गोष्ट म्हटली आहे.†

**परमं गुह्यम्**—आपल्या मुख्य मुख्य विभूती सांगितल्यानंतर भगवंत दहाव्या अध्यायाच्या शेवटी स्वत:च म्हणाले की, मी आपल्या कोण्या एका अंशात संपूर्ण जगताला, अनन्त कोटी ब्रह्मांडांना व्यापून स्थित आहे (१०।४२) अर्थात् भगवंतांनी स्वत: आपला परिचय देऊन सांगितले की, मी कसा आहे ! याच गोष्टीला अर्जुन विशेष गोपनीय मानत आहेत.

**अध्यात्मसञ्ज्ञितम्**—दहाव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, जो माझ्या विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणून घेतो अर्थात् संपूर्ण विभूतींच्या मूळात भगवान्‌च आहेत आणि संपूर्ण विभूती भगवंताच्या सामर्थ्यानेच प्रगट होतात. तसेच शेवटी भगवंतातच लीन होतात—असे जो तत्त्वाने जाणून घेतो, तो अविचल भक्तियोगाने

* भगवंताच्या कृपेचा अनुभव करून, अर्जुन भावमग्न झाले आणि कृपेचे रहस्य प्रगट करण्यासाठी जेव्हा अत्यंत प्रेमाने, प्रसन्नतेने बोलले, त्यावेळी नियमाचे लक्ष न राहिल्याने हा श्लोक तेहतीस अक्षराचा झाला परंतु संपूर्ण गीतेत अनुष्टुप् छन्दाचे श्लोक बत्तीस अक्षरांचेच आले आहेत. तात्पर्य, अत्यधिक प्रसन्नता असते त्या वेळी नियमाकडे लक्ष राहत नसते.

† तसे पाहिले तर पहिल्या अध्यायापासून येथपर्यंत भगवंतांनी जे काही म्हटले आहे, ते सर्व कृपेला परवश होऊनच म्हटले आहे. वास्तविक संपूर्ण क्रियांत भगवंताची कृपाच भरलेली असते, परंतु मनुष्य त्याला ओळखत नाही. भगवंताच्या कृपेची ओळख झाल्यावर भगवत्तत्त्वाचा अनुभव फारच सोपा होतो आणि लवकर होतो. अर्जुनाचे लक्ष जेव्हा भगवत्कृपेकडे वळते, तेव्हा ते भावमग्न होऊन म्हणतात की, आपल्या कृपेने माझा मोह नष्ट झाला आहे.

युक्त होतो. याच गोष्टीला अर्जुन अध्यात्माविषयी उपदेश (अध्यात्मसंज्ञित) मानत आहेत*.

**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम**—संपूर्ण जगत् भगवंताच्या कोण्या एका अंशात आहे—या गोष्टीवर पूर्वी अर्जुनाची दृष्टी नव्हती आणि ते स्वतः ही गोष्ट जाणतही नव्हते, हाच त्यांचा मोह होता. परंतु जेव्हा भगवंतांनी म्हटले की, संपूर्ण जगताला आपल्या एका अंशात व्यापून मी तुझ्यासमोर बसलेला आहे, तेव्हा अर्जुनाची दृष्टी याकडे वळली की, भगवान् किती विलक्षण आहेत, त्यांच्या कोण्या एका अंशात अनन्त सृष्टी उत्पन्न होतात, त्यात स्थित राहतात आणि त्यातच लीन होतात आणि ते मात्र तसेच्या तसेच राहतात. हा मोह नष्ट होताच अर्जुनाला लक्षात आले की, पूर्वी आपण ही गोष्ट जाणत नव्हतो हा आपला मोहच होता.† म्हणून अर्जुन या ठिकाणी आपल्या दृष्टीने म्हणतात की, हे भगवंत ! माझा हा मोह संपूर्णपणे नष्ट झाला आहे. परंतु असे म्हटले तरी, भगवंतांनी ह्या गोष्टीला (अर्जुनाच्या मोह-नाशाला) स्वीकार केले नाही. कारण पुढे एकोणपन्नासाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, तुला व्यथा आणि मूढभाव (मोह) होता कामा नये. **"मा ते व्यथा मा च विमूढभावः"**

**परिशिष्ट भाव**—अर्जुन म्हणतात की, आपण जी वचने सांगितली आहेत, ती केवळ मझ्यावर कृपा करूनच सांगितली आहेत, स्वतःची विद्वत्ता दाखविण्यासाठी नव्हे. यात केवळ कृपेशिवाय दुसरा कोणताही हेतू नाही.

संपूर्ण प्राण्यांच्या आदि, मध्य आणि अंती मीच आहे (१० । २०), मीच संपूर्ण प्राण्यांचे बीज आहे (१० । ३९), ऐश्वर्य, शोभा आणि बलांनी युक्त प्रत्येक वस्तूला माझ्याच योगाच्या अंशाने उत्पन्न झाली आहे, असे समज (१० । ४०). मी आपल्या एका अंशाने संपूर्ण जगताला व्याप्त करून स्थित आहे. (१० । ४२) ही वचने ऐकल्यावर अर्जुनाला असे वाटले की, माझा मोह नष्ट झाला आहे. परंतु वास्तविक त्यांचा आंशिक मोह नष्ट झाला आहे, पूर्ण नाही.

***संबंध**—मोह कसा नष्ट झाला—यालाच पुढील श्लोकात विस्ताराने सांगत आहेत.*

## भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया।
## त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्॥ २॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | | विनाश | **च** | = आणि |
| **कमल पत्राक्ष** | = हे कमलनयन! | **मया** | = मी | | (आपले) |
| **भूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांची | **विस्तरशः** | = विस्तारपूर्वक | **अव्ययम्** | = अविनाशी |
| | | **त्वत्तः** | = आपल्याकडूनच | **माहात्म्यम्,** | = माहात्म्यही |
| **भवाप्ययौ** | = उत्पत्ती आणि | **श्रुतौ** | = ऐकला आहे | **अपि** | (ऐकले आहे) |

***व्याख्या**—* **भवाप्ययौ हि भूतानां त्वत्तः श्रुतौ विस्तरशो मया**—भगवंतांनी पूर्वी म्हटले होते—मी संपूर्ण जगताचा प्रभव आणि प्रलय आहे, माझ्या व्यतिरिक्त इतर कोणीही कारण नाही (७।६-७) सात्त्विक, राजस आणि तामस भाव माझ्यापासूनच होतात (७।१२), प्राण्यांचे वेगवेगळे अनेक प्रकारचे भाव माझ्यापासूनच होतात (१०।४-५), संपूर्ण प्राणी माझ्यापासूनच उत्पन्न होतात आणि माझ्यामुळेच सर्व क्रिया करतात (१०।८), प्राण्यांच्या आदि, मध्य आणि अंती मीच आहे (१०।२०) आणि संपूर्ण सृष्टीच्या आदि, मध्य तसेच अंती मीच आहे (१०।३२). ह्या सर्वांना अनुसरूनच अर्जुन येथे म्हणत आहेत की, मी आपल्याकडून प्राण्यांच्या उत्पत्ती आणि प्रलयाचे वर्णन विस्ताराने ऐकले आहे. याचे तात्पर्य, प्राण्यांची उत्पत्ती आणि विनाश ऐकण्याशी नव्हे तर याचे तात्पर्य, सर्व प्राणी आपल्यापासूनच उत्पन्न होतात, आपल्यातच स्थित राहतात आणि आपल्यातच लीन होतात अर्थात् सर्व काही आपणच आहात, हे ऐकण्याशी आहे.

**माहात्म्यमपि चाव्ययम्**—आपण दहाव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात सांगितले की, माझ्या विभूती आणि योगाला जो तत्त्वाने जाणून घेतो, तो अविचल भक्तियोगाने युक्त होतो. अशा प्रकारे आपल्या विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणून घेण्याचे माहात्म्यही मी ऐकले आहे.

माहात्म्याला अव्यय म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, भगवंताच्या विभूतींना आणि योगाला तत्त्वाने जाणून घेतल्यावर

---

* भगवंतांनी आत्तापर्यंत भक्तीविषयी ज्या गोष्टी सांगितल्या त्या सर्व परम गोपनीय अध्यात्म उपदेश आहे.

† मोह असताना मोहाचे ज्ञान नसते तर मोह नष्ट झाल्यावरच मोहाचे ज्ञान होत असते आणि ज्ञान प्राप्त झाल्यास मोह राहतच नाही.

भगवंताविषयी जी भक्ती निर्माण होते, प्रेम निर्माण होते, भगवंताविषयीची अभिन्नता जाणवते, ते सर्व अव्यय आहे. कारण भगवान् अव्यय, नित्य आहेत तर त्यांची भक्ती, प्रेमही नित्य, अव्ययच असणार!

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात अर्जुन आपल्या दृष्टीने मोह नष्ट होण्याचे कारण सांगतात.

**'माहात्म्यमपि चाव्ययम्'**—येथे **'अपि'** पदाचा असा अर्थ निघतो की, अर्जुनाने भगवंताचे विनाशी माहात्म्यही ऐकले आहे आणि अविनाशी माहात्म्यही ऐकले आहे. **'भवाप्ययौ हि भूतानाम्'**—हे भगवंताचे विनाशी अर्थात् परिवर्तनशील माहात्म्य आहे. मनुष्याने भगवंताशी कोणत्याही प्रकाराने संबंध जोडला तर तो कल्याणच करेल—हे भगवंताचे अविनाशी अर्थात् अपरिवर्तनशील माहात्म्य आहे. तात्पर्य हे आहे की, सत्, असत् सर्व काही भगवानच आहेत—**'सदसच्चाहम्'** (गीता ९।१९)

***संबंध***—*आता पुढील दोन श्लोकांत अर्जुन विराटरूपाच्या दर्शनासाठी भगवंतास प्रार्थना करीत आहेत.*

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम॥ ३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुरुषोत्तम** | = हे पुरुषोत्तम! | **आत्थ** | = सांगत आहात, | **ते** | = आपल्या |
| **त्वम्** | = आपण | | | **ऐश्वरम्** | = ईश्वरसंबंधी |
| **आत्मानम्** | = आपल्या स्वत:ला | **एतत्** | = ते (वास्तविक) | **रूपम्** | = रूपाला (मी) |
| | | **एवम्** | = तसेच आहे. | **द्रष्टुम्** | = पाहू |
| **यथा** | = जसे | **परमेश्वर** | = हे परमेश्वर! | **इच्छामि** | = इच्छितो. |

*व्याख्या*—**पुरुषोत्तम**—हे संबोधन देण्याचे तात्पर्य; हे भगवंता! माझ्या दृष्टीने या संसारात आपल्यासारखे कोणी उत्तम, श्रेष्ठ नाही अर्थात् आपणच सर्वापेक्षा उत्तम आणि श्रेष्ठ आहात. ह्या गोष्टीला पुढे (१५।१८) श्लोकात भगवंतांनीही म्हटले आहे की, मी क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम आहे म्हणून मी शास्त्र आणि वेदात पुरुषोत्तम नावाने प्रसिद्ध आहे.

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं**—हे पुरुषोत्तमा! आपण (सातव्या अध्यायापासून दहाव्या अध्यायापर्यंत) माझ्यापुढे आपल्या अलौकिक प्रभावाचे, सामर्थ्याचे जे काही वर्णन केले, ते वास्तविक तसेच आहे.

हा संसार माझ्यापासूनच उत्पन्न होत असतो आणि माझ्यातच लीन होत असतो (७।६), माझ्या व्यतिरिक्त याचे दुसरे कोणीही कारण नाही (७।७), सर्व काही वासुदेवच आहे (७।१९), ब्रह्म, आध्यात्म, कर्म, आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञरूपात मीच आहे (७।२९-३०), अनन्य-भक्तीने प्राप्त होणारे परमतत्त्व मीच आहे (८।२२), माझ्यानेच हा संपूर्ण संसार व्यापलेला आहे, परंतु मी संसारात आणि संसार माझ्यात नाही (९।४-५), सत् आणि असत्‌रूपाने सर्व काही मीच आहे (९।१९), मीच संसाराचे मूळ कारण आहे आणि माझ्यापासूनच संपूर्ण संसार सत्ता-स्फूर्ती मिळवितो. (१०।८), हा संपूर्ण संसार माझ्याच कोण्या एका अंशात स्थित आहे (१०।४२) इत्यादी इत्यादी. आपण आपल्या स्वत: ला जे काही म्हटले आहे, ते सर्वच्या सर्व यथार्थच आहे.

**परमेश्वर**—भगवंताच्या मुखातून पूर्वी अर्जुनाने ऐकले आहे की, ''मीच संपूर्ण प्राण्यांचा आणि संपूर्ण लोकांचा महान् ईश्वर आहे.-'' ''**भूतानामीश्वरोऽपि**'' (४।६), ''**सर्वलोकमहेश्वरम्**'' (५।२९). म्हणून येथे अर्जुन भगवंताच्या विलक्षण प्रभावाने प्रभावित होऊन त्यांना ''**परमेश्वर**'' संबोधन देत आहेत. ज्याचे तात्पर्य; हे भगवंता! वास्तविक आपणच परम ईश्वर आहात, आपणच संपूर्ण ऐश्वर्याचे मालक आहात.

**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरम्**—अर्जुन म्हणतात की, मी आपल्याकडून आपल्या माहात्म्यासह आपला प्रभाव ऐकला आहे आणि याविषयी माझ्या हृदयात दृढ विश्वासही झाला आहे. ''संपूर्ण संसार माझ्या शरीराच्या एका अंशात आहे'' हे ऐकून माझ्या मनात आपले ते रूप पाहण्याची उत्कट लालसा निर्माण होत आहे.

दुसरा भाव असा आहे की, आपण इतके विलक्षण आणि महान् असूनही माझ्याशी किती स्नेह ठेवत आहात, किती आत्मीयता ठेवत आहात की, मी जसे म्हणतो तसेच आपण करत आहात आणि जे काही विचारतो, त्याचे उत्तर देत आहात. या कारणाने आपल्याशी बोलण्याविषयी, विचारण्याविषयी किंचिन्मात्र संकोच न राहिल्याने माझ्या मनात आपले ते रूप पाहण्याची फार इच्छा होत आहे, ज्याच्या एका अंशात संपूर्ण संसार व्यापलेला आहे.

दहाव्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले होते की, आपण आपल्या संपूर्ण विभूती सांगा, काहीही ठेवू नका,-"**वक्तुमर्हस्यशेषेण**", तेव्हा भगवंतांनी विभूतीचे वर्णन करताना उपक्रमात आणि उपसंहारात म्हटले की, "माझ्या विभूतींचा अंत लागत नाही" (१०।१९,४०). म्हणून भगवंतांनी विभूतींचे वर्णन संक्षेपानेच केले. परंतु येथे जेव्हा अर्जुन म्हणतात की," मी तुमच्या एका रूपाला पाहू इच्छितो "**द्रष्टुमिच्छामि ते रूपम्**" तेव्हा भगवान् पुढे म्हणतील की, "तू माझ्या शेकडो-हजारो रूपांना पहा (११।५)". जसे संसारात एखादा एखाद्याला लालचीने जास्त मागत सुटतो तर देणाऱ्यात देण्याचा भाव कमी होतो आणि तो कमी देतो. या उलट एखादा जर संकोचाने कमी मागत असेल, तर देणारा उदारतेने अधिक देत असतो. त्याचप्रमाणे तेथे अर्जुनाने स्पष्ट शब्दात म्हटले होते की, आपण आपल्या संपूर्ण विभूती सांगाव्या, तेव्हा भगवान् म्हणाले "मी आपल्या विभूती संक्षेपाने सांगेन". ह्या घटनेने अर्जुन सावधान होतात की, आता यापुढे आपल्याकडून काही अनुचित गोष्ट घडू नये. म्हणून अर्जुन येथे संकोचाने म्हणतात की, जर माझ्याकडून आपले विराट स्वरूप पाहणे शक्य असेल तर दाखवा. अर्जुनाच्या या संकोचाला पाहून भगवान् मोठ्या उदारतेने म्हणतात की, तू माझ्या शेकडो-हजारो रूपांना पाहून घे.

दुसरा भाव असा आहे की, अर्जुनाच्या रथात एका ठिकाणी बसलेल्या भगवंतांनी हे म्हटले की "तू जे या माझ्या शरीराला पाहत आहेस, याच्या कोण्या एका अंशात संपूर्ण जगत् (ज्याच्या अंतर्गत अनंत कोटी ब्रह्मांड आहेत) व्यापून आहे". तात्पर्य भगवंताचे शरीर लहानसे आहे आणि या लहानशा शरीराच्या कोण्या एका अंशात संपूर्ण जगत् आहे. म्हणून त्या एका अंशात स्थित असलेल्या रूपाला मी पाहू इच्छितो. हेच अर्जुनाच्या "रूपम्" (एकरूप) म्हणण्याचा आशय असावा असे वाटते.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाच्या म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, मी आपण सांगितलेल्या गोष्टी ऐकून चांगल्यारीतीने समजून घेतले आहे आणि आता मला त्यात कोणताही संशय राहिला नाही. सर्व काही आपणच आहात—ही गोष्ट निश्चित अशीच आहे. आता केवळ आपले ईश्वरसंबंधी रूप पाहणे बाकी राहिले आहे.

उपदेश दोन प्रकारचा असतो—सांगणे आणि करून दाखविणे. पूर्वी दहाव्या अध्यायात भगवंताने आपल्या समग्ररूपाचे वर्णन केले की, मी आपल्या एका अंशाने संपूर्ण जगताला व्याप्त करून स्थित आहे. आता या अध्यायात अर्जुन तेच रूप प्रत्यक्ष दाखविण्याची प्रार्थना करतात.

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्॥ ४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रभो** | = हे प्रभो! | **इति** | = असे | **त्वम्** | = आपण |
| **मया** | = माझ्याद्वारा | **यदि** | = जर | **आत्मानम्** | = आपल्या (त्या) |
| **तत्** | = (आपले) ते ऐश्वररूप | **मन्यसे** | = (आपणाला) वाटत असेल | **अव्ययम्** | = अविनाशी स्वरूपाचे |
| **द्रष्टुम्** | = पाहणे | **ततः** | = तर | **मे** | = मला |
| **शक्यम्** | = शक्य आहे | **योगेश्वर** | = हे योगेश्वर! | **दर्शय** | = दर्शन करवा. |

*व्याख्या*—**प्रभो**—"प्रभू" सर्वसमर्थ असणारास म्हटले जाते. म्हणून या संबोधनाचा भाव असा वाटतो की, जर आपण माझ्या ठिकाणी आपले विराटरूप पाहण्याचे सामर्थ्य आहे असे गृहीत धरत असाल तर ठीक आहे आणि नसेल तर आपण मला असे सामर्थ्य प्रदान करा की, जेणेकरून मी आपले ते ईश्वरीय (ईश्वरसंबंधी) रूप पाहू शकेन.

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति**—याचे तात्पर्य, जर आपण आपले ते रूप नाही दाखविले तरीही, मी असेच समजेन की, आपले रूप ते तसेच आहे; परंतु मी ते पाहण्याचा अधिकारी नव्हे, पात्र नव्हे, माझ्या ठिकाणी ती योग्यता नाही. अशा प्रकारे अर्जुनाला भगवंताच्या वचनाविषयी मुळीच शंका नाही, तर दृढ विश्वास आहे. म्हणून तर ते म्हणतात की, आपण मला आपले विराट-रूप दाखवा.

**योगेश्वर**—"**योगेश्वर**" संबोधन देण्याचा भाव असा वाटतो की, भक्तियोग, ज्ञानयोग, कर्मयोग, ध्यानयोग, हठयोग, राजयोग, लययोग, मंत्रयोग इत्यादी जितके योग असू शकतात, त्या सर्वांचे आपण स्वामी आहात. म्हणून आपण आपल्या अलौकिक योगशक्तीने आपले विराटरूप दाखवावे.

अर्जुनाने दहाव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात

भगवंतासाठी "**योगिन्**" संबोधन दिले होते; अर्थात् भगवंताला योगी म्हटले होते, परंतु आता अर्जुनाने भगवंताला "**योगेश्वर**" संबोधन दिले आहे; अर्थात् भगवंताला सर्व योगांचा स्वामी म्हटले आहे. कारण दहाव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाची भगवंताविषयी जी धारणा होती, त्या धारणेत आता फार परिवर्तन झाले आहे.

**ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्**—आपले ते स्वरूप तर अविनाशीच आहे, ज्यापासून अनंत सृष्टी उत्पन्न होतात, त्यात स्थित राहतात आणि त्यातच लीन होतात. आपण आपल्या अशा अविनाशी स्वरूपाचे दर्शन करवावे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या विश्वरूपाला '**अव्यय**' (अविनाशी) म्हटल्याने हे सिद्ध होते की, संपूर्ण संसार भगवंताचेच स्वरूप आहे. अव्यय असल्यामुळे याचा अत्यंत अभाव होत नाही (१५।१). वास्तविक परिवर्तनशील (असत्) आणि अपरिवर्तनशील (सत्)—दोन्हीही मिळून भगवंताचे समग्ररूप आहे—'**सदसच्चाहमर्जुन**' जडता केवळ आपल्या आसक्ती आणि अज्ञानामुळेच प्रतीत होते.

***संबंध***—*पूर्व श्लोकात अर्जुनाची नम्रतापूर्वक केलेली प्रार्थना ऐकून आता भगवान् अर्जुनाला विश्वरूप पाहण्यासाठी आज्ञा करतात.*

*श्रीभगवानुवाच*

## पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः।
## नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च॥५॥

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **च** | = आणि | **सहस्रशः** | = हजारो |
| **अथ** | = आता | **नाना-** | = अनेक वर्ण (रंग) व | **दिव्यानि** | = अलौकिक |
| **मे** | = माझ्या | **वर्णाकृतीनि** | अनेक आकृती असलेल्या | **रूपाणि** | = रूपांना |
| **नानाविधानी** | = अनेक प्रकारच्या | **शतशः** | = शेकडो | **पश्य** | = (तू) पहा. |

***व्याख्या***—**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः**—अर्जुनाची संकोचयुक्त प्रार्थना ऐकून भगवान् फारच प्रसन्न झाले, म्हणून अर्जुनाला "**पार्थ**" संबोधन देऊन म्हणतात की, तू माझ्या रूपांना पहा. रूपेही तीन-चार नव्हे तर शेकडो-हजारो रूपांना पहा अर्थात् अगणित रूपे पहा. भगवंतांनी ज्याप्रमाणे विभूतींच्या विषयात म्हटले आहे की, माझ्या विभूतींचा अंत लागू शकत नाही. त्याचप्रमाणे येथे भगवंतांनी आपल्या रूपाची अनंतता दाखविली आहे.

**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च**—आता भगवान् त्या रूपाच्या वैशिष्ट्याचे वर्णन करतात की, त्यांची बनावट अनेक प्रकारची आहे. त्यांचे रंगही वेगवेगळ्या प्रकारचे आहेत अर्थात् कोणी कोणत्या रंगाचा तर कोणी कोणत्या रंगाचा, कोणी पिवळा तर कोणी लाल इत्यादी इत्यादी. त्यातही एका एका रूपात किती तरी प्रकारचे रंग आहेत. त्या रूपांच्या आकृत्याही अनेक प्रकारच्या आहेत, अर्थात् कोणी लहान तर कोणी मोठा, कोणी उंच तर कोणी लठ्ठ इत्यादी इत्यादी.

ज्याप्रमाणे पृथ्वीचा एक लहानसा कण देखील पृथ्वीच आहे, त्याचप्रमाणे भगवंताच्या अनंत, अपार विश्वरूपाचा एक लहानसा अंश असल्याकारणाने हा संसारही विश्वरूपच आहे. परंतु हा संसार प्रत्येकाला दिव्य विश्वरूपाने दिसत नाही तर सामान्य संसाररूपाने दिसत असतो. कारण मनुष्याची दृष्टी भगवंताकडे न राहता संसाराकडेच राहत असते. ज्याप्रमाणे अवतार घेतल्यानंतर भगवान् सर्वांच्या समोर भगवत्स्वरूपाने प्रगट नसतात (७।२५) तर मनुष्यरूपानेच प्रगट राहतात. त्याचप्रमाणे विश्वरूपी भगवान् सर्वांच्या समोर संसाररूपानेच प्रगट राहतात.; अर्थात् प्रत्येकाला हे विश्वरूप संसाररूपानेच दिसत असते. परंतु येथे भगवान् आपल्या दिव्य अविनाशी विश्वरूपाने साक्षात् प्रगट होऊन अर्जुनाला म्हणत आहेत की, तू माझ्या दिव्य रूपांना पहा.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने तर स्वतःला असमर्थ स्वीकार करून भगवंताला त्यांचे एक ऐश्वररूप दाखविण्याची प्रार्थना केली होती आणि ती गोष्ट भगवंताच्या इच्छेवर सोडून दिली होती. परंतु भगवान् त्यांना शेकडो-हजारो रूप पाहण्यास सांगतात. यावरुन सिद्ध होते की, भगवंताच्या इच्छेवर सोडल्याने साधकाला जो लाभ होतो, तो आपल्या इच्छेने, आपल्या बुद्धीने होत

नाही. कारण मनुष्य कितीही विद्या, कला-कौशल्य इत्यादी हस्तगत करो, कितीही शास्त्राचे अध्ययन करो तरीही त्याची बुद्धी तुच्छ, सीमितच राहते. साधकात जितका सरळतेचा, निर्बलतेचा, निरभिमानतेचा भाव राहील तितकाच तो भगवंताला जाणेल. अभिमान करून साधक भगवंताला जाणून घेण्यात अटकावच करतो. तो जितका समजदार बनतो तितकाच बेसमज राहतो. स्वतःला समजदार मानल्याने तो समजदारीचा गुलाम बनतो. तो जितका निरभिमान असतो, समजदारीचा अभिमान करीत नाही, तितकाच तो समजदार होतो.

***संबंध*—** *पूर्व श्लोकात भगवंतांनी आपल्या विश्वरूपात अनेक प्रकारचे वर्ण आणि आकृती पाहण्याविषयी म्हटले. आता पुढील श्लोकात देवतांना पाहण्याविषयी सांगत आहेत.*

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! | | कुमारांना | | पूर्वी कधी पाहिले नाहीस, |
| **आदित्यान्** | = बारा आदित्यांना, | **तथा** | = आणि | **बहूनि** | = (अशा) पुष्कळशा |
| **वसून्** | = आठ वसूंना, | **मरुतः** | = एकोणपन्नास मरुद्गणांना | **आश्चर्याणि** | = आश्चर्यकारक रूपांना (ही) |
| **रूद्रान्** | = अकरा रुद्रांना (आणि) | **पश्य** | = पहा. | **पश्य** | = (तू) पहा. |
| **अश्विनौ** | = दोन अश्विनी- | **अदृष्टपूर्वाणि** | = ज्यांना तू- | | |

***व्याख्या*— पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा—** अदितिचे पुत्र धाता, मित्र, अर्यमा, शक्र, वरुण, अंश, भग, विवस्वान्, पूषा, सविता, त्वष्टा, आणि विष्णू हे बारा "आदित्य" आहेत. (महाभारत आदि० ६५।१५-१६)

धर, ध्रुव, सोम, अहः, अनिल, अनल, प्रत्यूष आणि प्रभास—हे आठ "वसू" आहेत (महाभारत आदि० ६६।१८).

हर, बहुरूप, त्रयम्बक, अपराजित, वृषाकपि, शम्भु, कपर्दी, रैवत, मृगव्याध, शर्व आणि कपाली—हे अकरा "रुद्र" आहेत. (हरिवंश १।३।५१-५२)

"अश्विनीकुमार" दोन आहेत—हे दोघे बंधू देवतांचे वैद्य आहेत.

सत्त्वज्योती, आदित्य, सत्यज्योती, तिर्यग्ज्योती, सज्योती, ज्योतिष्मान्, हरित, ऋतजित्, सत्यजित्, सुषेण, सेनजित्, सत्यमित्र, अभिमित्र, हरिमित्र, कृत, सत्य, ध्रुव, धर्ता, विधर्ता, विधारय, ध्वान्त, धुनी, उग्र, भीम, अभियु, साक्षिप, ईदृक्, अन्यादृक्, यादृक्, प्रतिकृत्, ऋक्, समिति, संरम्भ, ईदृक्ष, पुरुष, अन्यादृक्ष, चेतस, समिता, समिदृक्ष, प्रतिदृक्ष, मरुती, सरत, देव, दिश, यजुः, अनुदृक्, साम, मानुष, आणि विश्—हे एकोणपन्नास "मरुत्" आहेत.

(वायुपुराण ६७।१२३-१३०)-या सर्वांना तू माझ्या विराटरूपात पहा.

बारा आदित्य, आठ वसू, अकरा रुद्र, आणि दोन अश्विनीकुमार—हे तेहतीस कोटी (तेहतीस प्रकारच्या) देवता संपूर्ण देवतांमध्ये मुख्य आहेत. मरुद्गणांचेही नाव देवतांमध्ये येते, परंतु ते एकोणपन्नास मरुद्गण या तेहतीस प्रकारच्या देवतांपेक्षा वेगळे मानले जातात. कारण ते सर्व दैत्यांपासून देव बनलेले आहेत. म्हणून भगवंतानीही "**तथा**" पद देऊन मरुद्गणांना वेगळे म्हटले आहे.

**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत—**तू या रूपांना पूर्वी कधी डोळ्यांनी पाहिले नाहीस, कानांनी ऐकले नाहीस, मनाने चिंतन केले नाहीस, बुद्धीने कल्पना केली नाहीस. या रूपाकडे तुझी कधी वृत्तीच गेली नाही. अशा पुष्कळशा अदृष्ट असणाऱ्या रूपांना तू यावेळी प्रत्यक्ष पहा.

या रूपांना पाहताच आश्चर्य वाटेल की, काय विचित्र भगवंताची रूपे आहेत? अशा अद्भुत रूपांना तू पहा.

**परिशिष्ट भाव**—मागील श्लोकात भगवंताने विराटरूपात अनेक प्रकारच्या अनेक रंगांच्या आणि अनेक आकृती असणाऱ्या रूपांना पहा म्हटले होते, आता तीच गोष्ट या श्लोकात विस्ताराने सांगत आहेत.

भगवंताच्या कथनाचे तात्पर्य हे आहे की, सर्वच देवता माझे स्वरूप आहेत अर्थात् त्या देवतांच्या रूपात मीच आहे (गीता ९।२३).

***संबंध*—** *भगवंताकडून विश्वरूप पाहण्याची आज्ञा झाल्यावर अर्जुनाची जिज्ञासा अशी होऊ शकते की, मी या रूपांना कुठे पाहू? म्हणून भगवान् म्हणतात.*

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि॥ ७॥**

**गुडाकेश** = हे निद्राजित अर्जुन!
**मम** = माझ्या
**इह** = या
**देहे** = शरीराच्या
**एकस्थम्** = एका देशात
**सचराचरम्** = चराचरासहित
**कृत्स्नम्** = संपूर्ण
**जगत्** = जगताला
**अद्य** = आता
**पश्य** = पहा.
**अन्यत्** = याशिवाय (तुला)
**च** = आणखीही
**यत्** = जे काही
**द्रष्टुम्** = पाहण्याची
**इच्छसि** = इच्छा असेल (तेही पाहून घे.)

*व्याख्या*— **गुडाकेश**—निद्रेवर अधिकार प्राप्त करून घेतल्याने अर्जुनाला ''गुडाकेश'' म्हणतात. या ठिकाणी हे संबोधन देण्याचे तात्पर्य, तू आळसाचा त्याग करून सावधानीने माझ्या विश्वरूपाला पहा.

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्, मम देहे**— दहाव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी म्हटले होते की, मी संपूर्ण जगताला एका अंशाने व्यापून स्थित आहे. यावरुनच अर्जुनाच्या मनात विश्वरूप पाहण्याची इच्छा झाली. म्हणून भगवान् म्हणतात की, घोड्याचा लगाम आणि चाबुक हातात घेऊन तुझ्या समोर बसलेल्या माझ्या या शरीराच्या एका देशात (अंशात) चराचरसहित संपूर्ण जगताला पहा. एका देशात पाहण्याचा अर्थ, तू जेथे दृष्टी टाकशील तेथे तुला अनंत ब्रह्मांड दिसतील, असा आहे. तू मनुष्य, देवता, यक्ष, राक्षस, भूत, पशू, पक्षी इत्यादी, चालणारे-फिरणारे जंगम आणि वृक्ष, लता, गवत, रोपटे इत्यादी स्थावर तसेच पृथ्वी, डोंगर रेती इत्यादी जडासह संपूर्ण जगताला '**अद्य**' आत्ताच याच क्षणी पाहून घे, ह्यात आता विलम्बाचे काम नाही.

**यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि**—भगवंताच्या शरीरात सर्व गोष्टी वर्तमान होत्या अर्थात् ज्या गोष्टी भूतकाळात घडल्या आहेत आणि ज्या भविष्यात घडणार आहेत. त्या सर्व गोष्टी भगवंताच्या शरीरात विद्यमान होत्या. म्हणून भगवान् म्हणतात की, तू आणखी जे काही पाहू इच्छित असशील तेही पाहून घे. अर्जुन आणखी काय पाहू इच्छित होते? अर्जुनाच्या मनात शंका होती की, विजय आपला होईल अथवा कौरवांचा (२।६) ? म्हणून भगवान् म्हणतात की, तेही तू माझ्या या शरीराच्या एका अंशात पाहून घे.

**विशेष गोष्ट**

ज्याप्रमाणे दहाव्या अध्यायात भगवंताकडून ''जो माझ्या विभूती आणि योगाला तत्त्वाने जाणून घेतो, त्याचा माझ्या ठिकाणी दृढ भक्तियोग होतो'' ही गोष्ट ऐकूनच अर्जुनाने भगवंताची स्तुती प्रार्थना करून विभूती विचारल्या होत्या. त्याचप्रमाणे भगवंताकडून ''माझ्या एका अंशात संपूर्ण संसार स्थित आहे'' ही गोष्ट ऐकून अर्जुनाने विश्वरूप दाखविण्याची प्रार्थना केली आहे. जर भगवंताने ''**अथवा**'' म्हणून आपल्याकडूनच ''माझ्या कोण्या एका अंशात संपूर्ण जगत स्थित आहे'' ही गोष्ट सांगितली नसती तर, अर्जुनाने विश्वरूप पाहण्याची इच्छाच केली नसती. जर इच्छाच केली नसती, तर मग विश्वरूप दाखविण्यासाठी प्रार्थना कशाला केली असती? आणि जर प्रार्थनाच केली नसती, तर मग भगवंताने आपले विश्वरूप कशाला दाखविले असते? यावरुन सिद्ध होते की, भगवंत कृपा करून आपल्याकडूनच अर्जुनाला आपले विश्वरूप दाखवू इच्छित आहेत.

अशीच गोष्ट गीतेच्या आरंभीही आली आहे. जेव्हा अर्जुनाने दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ उभा करण्यासाठी म्हटले होते, तेव्हा भगवंतांनी पितामह भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य ह्यांच्या समोर रथ उभा केला आणि अर्जुनाला म्हटले, ''या कुरुवंशीयांना पहा'' ''**कुरून् पश्य**'' (१।२५) याचा हाच आशय दिसतो की, भगवान् कृपेने गीता प्रगट करू इच्छित आहेत. कारण जर भगवंतांनी असे म्हटले नसते, तर अर्जुनाला शोक झाला नसता आणि गीतेचा उपदेश आरंभ झाला नसता. तात्पर्य, भगवंतांनी आपल्याकडून कृपा करूनच गीता प्रगट केली आहे.

**परिशिष्ट भाव**— भगवान् आपल्या शरीराच्या एका अंशात संपूर्ण जगत् पाहण्याची आज्ञा देतात. यावरुन सिद्ध होते की, भगवान् श्रीकृष्ण समग्र आहेत आणि त्यांच्या एका अंशात संपूर्ण संसार आहे. *'रोम रोम प्रति लागे कोटि कोटि ब्रह्मंड'* (मानस बाल० २०१)—भगवान् हे प्रत्यक्ष दाखवित आहेत. जर संपूर्ण संसार भगवंताच्या कोण्या एका अंशात स्थित आहे तर मग भगवंताशिवाय काय बाकी राहिले? सर्व काही भगवान्च झाले. म्हणून भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू जे काहीही पाहू इच्छितोस, ते सर्व तू माझ्या विराटरूपात पाहू शकतोस. अर्जुन युद्धाचा परिणाम पाहू इच्छित होते, जे त्यांनी विराटरूपातच पाहून घेतले (गीता ११। २६-२७).

***संबंध***—भगवंतांनी तीन श्लोकात चार वेळा ''पश्य'' पदाने आपले रूप पाहण्यासाठी आज्ञा केली. यानुसारच अर्जुन डोळे फाड-फाडून पाहतात आणि पाहूही इच्छितात परंतु अर्जुनाला काहीही दिसत नाही. म्हणून आता भगवान् पुढील श्लोकात अर्जुनाला न दिसण्याचे कारण सांगून त्यांना दिव्य दृष्टी देऊन विश्वरूप पाहण्याची आज्ञा करतात.

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्॥८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **द्रष्टुम्, एव** | = पाहूच | **ददामि** | = देतो, (त्यांनी तू) |
| **अनेन** | = (तू) या | **शक्यसे** | = शकत | **मे** | = माझ्या |
| **स्वचक्षुषा** | = आपल्या डोळ्याने (चर्म चक्षूने) | **न** | = नाहीस, | **ऐश्वरम्** | = ईश्वरीय |
| | | **ते** | = (म्हणून मी) तुला | **योगम्** | = सामर्थ्याला |
| | | **दिव्यम्** | = दिव्य | **पश्य** | = पहा. |
| **माम्** | = मला | **चक्षुः** | = चक्षू | | |

***व्याख्या*— न तु मां शक्यसे द्रष्टु मनेनैव स्वचक्षुषा—** तुझे जे चर्मचक्षू आहेत, त्यांची शक्ती फारच थोडी आणि सीमित आहे. हे चर्मचक्षू प्राकृत असल्याकारणाने केवळ प्रकृतीच्या छोट्याशा कार्यालाच पाहू शकतात; अर्थात् प्राकृत मनुष्य, पशू, पक्षी इत्यादीच्या रूपांना, त्यांच्या भेदांना तसेच ऊन, सावली इत्यादीच्या रूपांनाच पाहू शकतात. परंतु ते मन, बुद्धी इंद्रियांच्या पलीकडे असलेल्या माझ्या रूपाला पाहू शकत नाहीत.

**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्**—मी तुला अतीन्द्रिय, अलौकिक रूप पाहण्याचे सामर्थ्य असणारे दिव्य चक्षू देत आहे अर्थात् तुझ्या ह्या चर्मचक्षूंमध्येच दिव्य शक्ती प्रदान करत आहे; ज्यामुळे तू अतीन्द्रिय आणि अलौकिक पदार्थही पाहू शकशील आणि त्याचबरोबर त्यांच्या दिव्यतेलाही पाहू शकशील.

जरी दिव्यता पाहणे डोळ्याचा विषय नव्हे, तर बुद्धीचा विषय आहे तरी, पण भगवान् म्हणतात, मी दिलेल्या दिव्य चक्षूंनी तू दिव्यतेला अर्थात् माझ्या ईश्वरसंबंधी अलौकिक प्रभावालाही पाहू शकशील. तात्पर्य, माझे विराटरूप पाहण्यासाठी दिव्य चक्षूंची आवश्यकता आहे.

**पश्य**—या क्रियापदाचे दोन अर्थ होतात—बुद्धी (विवेक) ने पाहणे आणि डोळ्याने पाहणे. नवव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात भगवंतांनी **''पश्य मे योगमैश्वरम्''** म्हणून बुद्धीद्वारा पाहण्याची (जाणून घेणे) गोष्ट म्हटली होती. आता येथे **''पश्य मे योगमैश्वरम्''** म्हणून डोळ्याने पाहण्याविषयी म्हणत आहेत.

### विशेष गोष्ट

जसे एखाद्या ठिकाणी ''श्रीमद्भगवद्गीता'' असे लिहिलेले आहे. ज्याला वर्णमालेचे मुळीच ज्ञान नाही, त्याला तर ह्या केवळ काळ्या रेघाच दिसतात आणि ज्यांना वर्णमालेचे ज्ञान आहे, त्यांना ही अक्षरे दिसतात. परंतु जो सुशिक्षित आहे आणि ज्याला गीतेचा सखोल अभ्यास आहे, त्याला ''श्रीमद्भगवद्गीता'' असे लिहिलेले पाहताच, गीतेच्या अध्यायांच्या, श्लोकांच्या, भावांच्या सर्व गोष्टी दिसू लागतात. तसेच अर्जुनाला जेव्हा भगवंतांनी दिव्य चक्षू दिले, तेव्हा त्यांना अलौकिक विश्वरूप तसेच त्याची दिव्यता दिसू लागली, जो साधारण बुद्धीचा विषय नव्हे. हे सर्व सामर्थ्य भगवत्प्रदत्त दिव्य चक्षूंचेच होते.

आता येथे एक शंका येते की, जेव्हा अर्जुनाने चौथ्या श्लोकात म्हटले होते की, जर मी आपल्या विश्वरूपाला पाहू शकत असेल तर, आपण आपले विश्वरूप दाखवा, तेव्हाच त्याच्या उत्तरात भगवंतांनी हा आठवा श्लोक सांगावयास पाहिजे होता की, तू आपल्या या चर्मचक्षूंनी माझ्या विश्वरूपाला पाहू शकत नाहीस, म्हणून मी तुला दिव्य चक्षू प्रदान करतो. परंतु भगवंतांनी तेथे तसे म्हटले नाही तर दिव्य चक्षू देण्याच्या पूर्वीच **''पश्य-पश्य''** म्हणून वारंवार पाहण्या- विषयी आज्ञा केली. जेव्हा अर्जुनाला काही दिसले नाही, तेव्हा त्यांना न दिसण्याचे कारण सांगितले आणि मग दिव्य चक्षू प्रदान करून त्याचे निराकरण केले. म्हणून एवढा उठाठेव भगवंतांनी केलाच कशाला?

साधकावर भगवंताच्या कृपेचा क्रमाने कसा विस्तार होत असतो, हे दाखविण्यासाठीच भगवंतांनी असे केले आहे, कारण भगवंताचा असाच स्वभाव आहे. भगवान् अत्यंत कृपाळू आहेत. त्या कृपासागराच्या कृपेचा अंत लागत नाही. भक्तावर कृपा करण्याचे त्यांचे विचित्र ढंग असतात. जसे प्रथम तर भगवंतांनी अर्जुनाला उपदेश केला. उपदेशाद्वारा अर्जुनाच्या भावामध्ये परिवर्तन करवून त्यांना

आपल्या विभूतींचे ज्ञान करविले. त्या विभूतींना जाणून घेतल्याने अर्जुनाचे अंगी एक विलक्षणता निर्माण झाली. ज्यायोगे त्यांनी भगवंताला म्हटले की, आपले अमृत वचन ऐकतांना माझी तृप्ती होत नाही. विभूतींचे वर्णन करून शेवटी भगवंतांनी म्हटले की, अशा प्रकारचे (निरनिराळ्या विभूती असणारे) अनंत ब्रह्मांड माझ्या एका अंशात स्थित आहेत. ज्याच्या एका अंशात अनंत ब्रह्मांड आहेत. त्या विराटरूपाला अर्जुनास पाहण्याची इच्छा झाली आणि त्यासाठी त्यांनी प्रार्थना केली. यावर भगवंतांनी आपले विराटरूप दाखविले आणि त्याला वारंवार पाहण्याची आज्ञा केली. परंतु अर्जुनाला विराटरूप दिसले नाही. तेव्हा भगवंतांनी त्यांना दिव्य चक्षू प्रदान केले. सारांश, भगवंतांनीच विराटरूप दाखविण्याविषयीची जिज्ञासा अर्जुनात प्रगट केली. जिज्ञासा प्रगट करून विराटरूप दाखविण्याची इच्छा प्रगट केली. इच्छा प्रगट झाल्यावर विश्वरूप दाखवले. अर्जुनाला दिसेना, तेव्हा दिव्य चक्षू देऊन त्याची पूर्ती केली.

तात्पर्य, भगवंताला शरण झाल्यावर शरणागताचे सर्व काम करण्याची जिम्मेदारी भगवान् आपल्याकडे घेतात.

**परिशिष्ट भाव—'पश्य'** क्रिया पदाचे दोन अर्थ होतात—जाणणे आणि पाहणे. नवव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात **'पश्य मे योगमैश्वरम्'** पदांनी भगवंताला जाणण्याबद्दलचा विषय आला आहे आणि येथे 'पश्य मे योगमैश्वरम्' पदांनी भगवंताच्या विराटरूपाला पाहण्याची गोष्ट आली आहे. तात्पर्य हे आहे की, जे जाणण्यात येते तेही भगवंत आहेत आणि जे पाहण्यात येते तेही भगवंत आहेत. भगवंताशिवाय काहीही नाही. या अकराव्या अध्यायात भगवंताच्या अलौकिक रूपाला पाहण्याची विलक्षणता आहे, विवेचनाची विलक्षणता नाही. म्हणून गीतेच्या शेवटीही संजयाने एक तर 'संवाद' ची विलक्षणता सांगितली आहे आणि एक 'रूप' विलक्षणता सांगितली आहे (१८। ७६-७७).

भगवंताचे विराटरूप अलौकिक होते म्हणून ते पाहण्यासाठी भगवंताने अर्जुनाला अलौकिक चक्षू दिले.

***संबंध—** दिव्य चक्षू प्राप्त करून अर्जुनाने भगवंताचे रूप कसे पाहिले, ही गोष्ट संजय धृतराष्ट्राला पुढील श्लोकात सांगत आहेत.*

*सञ्जय उवाच*

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्॥ ९॥**

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **राजन्** | = हे राजन्! | **महायोगेश्वरः** | = महायोगेश्वर | **परमम्** | = परम |
| **एवम्** | = असे | **हरिः** | = भगवान् श्रीकृष्णाने | **ऐश्वरम्** | = ऐश्वर्यवान् |
| **उक्त्वा** | = म्हणून | | | **रूपम्** | = विराटरूप |
| **ततः** | = मग | **पार्थाय** | = अर्जुनाला | **दर्शयामास** | = दाखविले.* |

*व्याख्या—* **एवमुक्त्वा ततो.....परमं रुपमैश्वरम्—** पूर्व श्लोकात भगवंतांनी जे म्हटले होते की, "तू आपल्या चर्मचक्षूंनी मला पाहू शकत नाहीस, म्हणून मी तुला दिव्य चक्षू प्रदान करतो, ज्यामुळे तू माझ्या ईश्वरसंबंधी योगाला पहा" त्याचाच संकेत येथे संजयाने "**एवमुक्त्वा**" पदाने केला आहे.

चौथ्या श्लोकात अर्जुनाने भगवंताला "**योगेश्वर**" म्हटले आणि येथे संजय भगवंताला "**महायोगेश्वर**" म्हणत आहेत. याचे तात्पर्य, भगवंतांनी अर्जुनाच्या प्रार्थनेनुसार आपले भयंकर भव्य विश्वरूप दाखवले. भक्ताची थोडी देखील वास्तविक आवड भगवंताकडे झाल्यास, भगवान् आपल्या अपार शक्तीने त्याची पूर्ती करतात.

तीसऱ्या श्लोकात अर्जुनाने ज्या रूपासाठी "**रूपमैश्वरम्**" म्हटले, त्याच रूपासाठी संजय येथे "**परमं रूपमैश्वरम्**" म्हणत आहेत. याचे तात्पर्य, भगवंताचे विश्वरूप भयंकर विलक्षण आहे. संपूर्ण योगांचे महान् ईश्वर असलेल्या भगवान् श्रीकृष्णांनी असे विलक्षण, अलौकिक, अद्भुत विश्वरूप दाखविले, ज्या रूपाला धैर्यवान्, जितेन्द्रिय, शूरवीर आणि भगवंतापासून दिव्यदृष्टी प्राप्त झालेल्या अर्जुनालाही दुर्निरीक्ष्य म्हणावे लागले. (११।१७) आणि भयभीत व्हावे लागले (११।४५) तसेच भगवंतालाही "**व्यपेतभीः**" म्हणून अर्जुनाला आश्वासन द्यावे लागले (११।४९).

* संजयालाही वेदव्यासांकडून दिव्य दृष्टी मिळाली होती. म्हणून अर्जनाबरोबरच त्यांनीही भगवंताच्या विश्वरूपाचे दर्शन केले होते. (१७। ७७) आता संजय त्याच विश्वरूपाचे वर्णन धृतराष्ट्राजवळ करतात.

**परिशिष्ट भाव**—भगवंताना 'महायोगेश्वर' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवान् संपूर्ण योगांचे ईश्वर आहेत. असा कोणताही योग नाही ज्याचे ईश्वर (मालक) भगवान् नाहीत अर्थात् सर्व योग भगवंताच्या अंतर्गत आहेत.

अर्जुनाने तर भगवंताला 'योगेश्वर' म्हटले होते (११। ४), परंतु संजय भगवंताला 'महायोगेश्वर' म्हणतात. कारण संजय भगवंताला पूर्वीपासूनच अधिक जाणत होते. संजयापेक्षाही वेदव्यासजी भगवंताला अधिक जाणत होते. वेदव्यासांच्या कृपेनेच संजयाने भगवान् आणि अर्जुनाचा संवाद ऐकला—'**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्**' (गीता १८। ७५). वेदव्यासजी पेक्षाही अधिक भगवंताला भगवान् स्वतःच जाणतात (१०। २, १५).

***संबंध***—*आता संजय त्या भगवंताच्या परम ईश्वरीयसंबंधी रूपाचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करत आहेत.*

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम्।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्॥ १०॥**
**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम्।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम्॥ ११॥**

**अनेकवक्त्रनयनम्** = ज्यांचे अनेक मुख आणि नेत्र आहेत,
**अनेकाद्भुतदर्शनम्** = अनेक प्रकारची अद्भुत दर्शने आहेत,
**अनेकदिव्याभरणम्** = अनेक अलौकिक आभूषणे आहेत,
**दिव्यानेकोद्यतायुधम्** = हातात धरलेली अनेक दिव्य आयुधे आहेत
**दिव्यमाल्याम्बरधरम्** = (आणि) ज्यांच्या गळ्यात दिव्य माळा आहेत, जे अलौकिक वस्त्र परिधान केलेले आहेत,
**दिव्यगन्धानुलेपनम्** = ज्यांच्या कपाळावर आणि शरीरावर दिव्य चंदन, कुंकुम इत्यादी लावलेले आहे,
**सर्वाश्चर्यमयम्** = आशा संपूर्ण आश्चर्यमय,
**अनन्तम्** = अनंत रूपे असलेल्या (आणि)
**विश्वतोमुखम्** = सर्व बाजूंनी मुख असलेल्या
**देवम्** = देवरूपाला (आपल्या दिव्य स्वरूपाला) भगवंताने दाखविले.

***व्याख्या***— **अनेकवक्त्रनयनम्**—विराटरूपाने प्रगट झालेल्या भगवंताची जितकी मुखे आणि नेत्र दिसू लागली आहेत, ती सर्वची सर्व दिव्य आहेत. विराटरूपात जितके प्राणी दिसत आहेत, त्यांची मुखे, नेत्र, हात, पाय इत्यादी सर्वची सर्व अंग विराटरूप भगवंताची आहेत. कारण भगवान् स्वतःच विराटरूपाने प्रगट झाले आहेत.

**अनेकाद्भुतदर्शनम्**—भगवंताच्या विराटरूपात जितकी रूपे दिसत आहेत, जितक्या आकृत्या दिसत आहेत, जितके रंग दिसत आहेत, जितक्या त्यांच्या विचित्र रूपाचे घडण दिसत आहेत, ते सर्वचे सर्व अद्भुत दिसत आहेत.

**अनेकदिव्याभरणम्**—विराटरूपात दिसणाऱ्या अनेक रूपांच्या हातात, पायात, कानात, नाकात आणि गळ्यात जितके अलंकार आहेत, आभूषणे आहेत, ती सर्वची सर्व दिव्य आहेत. कारण भगवान् स्वतःच अलंकाराच्या रूपात प्रगट झाले आहेत.

**दिव्यानेकोद्यतायुधम्**—विराटरूपी भगवंतांनी आपल्या हातात चक्र, गदा, धनुष्य, बाण, परिघ इत्यादी अनेक प्रकारची जी आयुधे (अस्त्र-शस्त्र) धारण केली आहेत, ती संपूर्ण दिव्य आहेत.

**दिव्यमाल्याम्बरधरम्**—विराटरूपी भगवंतांनी गळ्यात फुलांच्या, सोन्याच्या, चांदीच्या, मोत्यांच्या, रत्नांच्या, गुंजांच्या इत्यादी अनेक प्रकारच्या माळा धारण केल्या आहेत. त्या सर्व दिव्य आहेत. त्यांनी आपल्या शरीरावर लाल, पिवळे, हिरवे, पांढरे, कपिश इत्यादी अनेक रंगाची वस्त्रे परिधान केलेली आहेत, जी सर्व दिव्य आहेत.

**दिव्यगन्धानुलेपनम्**—विराटरूप भगवंतांनी कपाळावर कस्तूरी, चंदन, कुंकुम इत्यादी गंधाचे जितके तिलक लावलेले आहेत, तसेच शरीरावर जितके लेप लावलेले आहेत, ते संपूर्ण दिव्य आहेत.

**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम्**—अशा प्रकारे पाहताच चकित करणारे अनंतरूप असणारे तसेच चारीही बाजूंनी मुखेच-मुखे असणारे आपले परम ऐश्वर्यमय रूप भगवंतांनी अर्जुनाला दाखविले.

जसे एखादा मनुष्य खूप अंतरावर असूनही आपल्या मनाने चिंतन करत असेल की, मी हरिद्वार येथे आहे, तसेच गंगेत स्नान करत आहे, त्यावेळी त्याला गंगा, पूल, घाटावर उभे असलेले स्त्री-पुरुष इत्यादी दिसू लागतात. तसेच मी गंगेत स्नान करत आहे, असेही दिसू लागते. वास्तविक तेथे हरिद्वार नाही किंवा गंगा नसते परंतु त्याचे मनच त्या सर्व रूपात बनलेले त्याला दिसत असते. तसेच, एक भगवान्‌च अनेक रूपात, त्या रूपात धारण केलेल्या अलंकाराच्या रूपात, अनेक प्रकारच्या आयुधाच्या रूपात, अनेक प्रकारच्या माळांच्या रूपात, अनेक प्रकारच्या वस्त्रांच्या रूपात, प्रगट झाले आहेत. म्हणून भगवंताच्या विराटरूपात सर्व काही दिव्य आहे.

श्रीमद्भागवतात अशी कथा आहे की, जेव्हा ब्रह्मदेवाने वासरे आणि गोपाळांना चोरून नेले, तेव्हा भगवान् स्वतःच वासरे आणि गोपाळ बनले. वासरे आणि गोपाळच नव्हे तर त्यांच्या काठ्या, शिंगे, बासरी, वस्त्र, आभूषण इत्यादीही भगवान् स्वतःच बनले (श्रीमद्भा० १०।१३।१९).

**परिशिष्ट भाव**—दुसऱ्या अध्यायात तर भगवंताच्या अंशाचे जीवाचे सर्व काही आश्चर्यमय वर्णन केले गेले आहे.(गीता २-२९) येथे भगवंताचे सर्व काही आश्चर्यमय सांगत आहेत. भगवंताला जितके पहात राहू, तितकी अधिकच विलक्षणता दिसून राहते. भगवंताची विलक्षणता अनंत आहे.

***संबंध**—आता संजय विश्वरूपाच्या प्रकाशाचे वर्णन करत आहेत.*

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **दिवि** | = (जरी) आकाशात | **सा** | = त्या सर्वांचा | **भासः** | = प्रकाशाची |
| **युगपत्** | = एकाच वेळी | **भाः** | = प्रकाश (एकत्र मिळूनसुद्धा) | **सदृशी** | = बरोबरी |
| **सूर्यसहस्रस्य** | = हजारो सूर्यांचा | **तस्य** | = त्या | **यदि** | = कदाचितच |
| **उत्थिता** | = उदय | **महात्मनः** | = महात्म्याच्या (विराटरूपाच्या) | **स्यात्** | = करू शकेल अर्थात् करू शकत नाही |
| **भवेत्** | = झाला (तरीही) | | | | |

*व्याख्या*— **दिवि सूर्यसहस्रस्य.....तस्य महात्मनः**— जसे आकाशात हजारो तारे एकाच वेळी उदय पावले तरी-ही, त्या सर्वांचा एकत्र झालेला प्रकाश एका चंद्राच्या प्रकाशा इतका होत नाही आणि हजारो चंद्रांचा एकत्र प्रकाश सूर्याच्या प्रकाशा इतका होऊ शकत नाही. तसेच आकाशात हजारो सूर्य एकाच वेळी उदय पावले तरीही त्या सर्वांचा एकत्र प्रकाश, विराटरूप भगवंताच्या प्रकाशा इतका होऊ शकत नाही. तात्पर्य, हजारो सूर्यांचा प्रकाशही विराटरूपी भगवंताच्या प्रकाशाला उपमा देण्याला योग्य होऊ शकत नाही. अशा प्रकारे जर हजारो सूर्यांच्या एकत्र प्रकाशाला उपमा बनविण्यास दिव्य दृष्टी धारण करणाऱ्या संजयालाही संकोच होत आहे तर तो प्रकाश विराटरूपी भगवंताच्या प्रकाशाला उपमा कशी देता येईल ? कारण सूर्याचा प्रकाश भौतिक आहे, परंतु विराट भगवंताचा प्रकाश दिव्य आहे. भौतिक प्रकाश कितीही मोठा असला तरीही, तो दिव्य प्रकाशापुढे तुच्छ ठरतो. भौतिक प्रकाश आणि दिव्य प्रकाश यांची जात वेगवेगळी असल्याने त्यांची आपसात तुलना केली जाऊ शकत नाही. मात्र अंगुली निर्देशाप्रमाणे भौतिक प्रकाशाच्या अनुरोधाने दिव्य प्रकाशाचा संकेत केला जाऊ शकतो. येथे संजयसुद्धा हजारो सूर्यांच्या भौतिक प्रकाशाची कल्पना करून विराटरूपी भगवंताच्या प्रकाशाकडे (तेजाकडे) लक्ष वेधतात.

**परिशिष्ट भाव**—हजारो सूर्यांचा प्रकाश एकत्र मिळूनसुद्धा भगवंताच्या प्रकाशाची बरोबरी करू शकत नाही, कारण सूर्यामध्ये तेच आहे तेही भगवंतापासूनच आले आहे. (गीता १५-१२) जरी हजारो सूर्यांचा प्रकाश झाला तरीही तो भौतिक आहे. परंतु भगवंताचा प्रकाश भौतिक नाही तर दिव्य आहे.

***संबंध**—मागील श्लोकात भगवंताच्या विराटरूपाचे दिव्य रूप, अवयव आणि तेजाचे वर्णन करून आता संजय अर्जुनाने पाहिलेल्या विश्वरूपाचे वर्णन करत आहेत.*

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तदा** | = त्यावेळी | **तत्र** | = त्या | **प्रविभक्तम्** | = विभागात विभागलेले |
| **पाण्डवः** | = अर्जुनाने | **शरीरे** | = शरीरामध्ये | **कृत्स्नम्** | = संपूर्ण |
| **देवदेवस्य** | = देवांचे देव असलेल्या भगवंताच्या | **एकस्थम्** | = एकाच जागी स्थित (असलेले) | **जगत्** | = जगत् |
| | | **अनेकधा** | = अनेक प्रकारच्या | **अपश्यत्** | = पाहिले |

*व्याख्या* —**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा**— अनेक प्रकारच्या विभागात, विभागलेले अर्थात् हे देवता आहेत, हे मनुष्य आहेत, हे पशु-पक्षी आहेत, ही पृथ्वी आहे, हा समुद्र आहे, हे आकाश आहे, ही नक्षत्रे आहेत इत्यादी इत्यादी विभागांसह (संकुचित नव्हे तर विस्तारासह) संपूर्ण चराचर जगताला भगवंताच्या शरीराच्याही एका देशात, अर्जुनाने भगवंतांनी दिलेल्या दिव्य चक्षूंनी प्रत्यक्ष पाहिले. तात्पर्य, भगवान् श्रीकृष्णाच्या लहानशा शरीराच्याही एका अंशात चर-अचर, स्थावर-जंगमासह संपूर्ण संसार स्थित आहे. तो संसारही अनेक ब्रह्मांडाच्या रूपात, अनेक देवतांच्या लोकांच्या रूपात, अनेक व्यक्ती आणि पदार्थांच्या रूपात विभक्त आहे आणि विस्तृत आहे. अशा प्रकारे अर्जुनाने स्पष्ट रूपाने पाहिले.*

**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा**—**"तदा"** चे तात्पर्य, ज्यावेळी भगवंतांनी दिव्यदृष्टी देऊन आपले विराटरूप दाखविले, त्यावेळी त्याला अर्जुनाने पाहिले. **"अपश्यत्"** चे तात्पर्य, जसे रूप भगवंतांनी दाखविले, तसेच अर्जुनाने पाहिले. संजय यापूर्वी भगवंताच्या जशा रूपाचे वर्णन करत आले आहेत; तसेच रूप अर्जुनानेही पाहिले.

ज्याप्रमाणे मनुष्यलोकापेक्षा देवलोक फार विलक्षण असतो त्याप्रमाणे देवलोकापेक्षाही भगवान् अनंतपटीने विलक्षण आहेत कारण देवलोक इत्यादी संपूर्ण लोक प्राकृत आहेत आणि भगवान् प्रकृतीच्या पलीकडील आहेत. म्हणून भगवान् **"देवदेव"** अर्थात् देवतांचेही देवता (स्वामी) आहेत.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने भगवंताच्या शरीरात एका जागी स्थित असलेले जरायुज, अण्डज, उद्भिज, स्वेदज, स्थावर-जंगम, नभचर-जलचर-थलचर, चौऱ्यांशी लक्ष योनी, चौदा भुवने इत्यादी अनेक विभागात विभागलेले जगत् पाहिले. जगत् जरी अनंत असले तरी ते भगवंताच्या एका अंशातच आहेत (गीता १०। ४२). अर्जुन भगवंताच्या शरीरात जेथे कोठे दृष्टी वळवितात तेथे त्यांना अनंत जगत् दिसत आहेत.

***संबंध***—*भगवंताच्या अलौकिक विराटरूपाला पाहिल्यानंतर अर्जुनाची काय स्थिती झाली याचे वर्णन संजय पुढील श्लोकात करतात.*

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः।**
**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत॥ १४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ततः** | = भगवंताचे विश्वरूप पाहून | | (आणि) | | जोडून |
| **सः** | = ते | **हृष्टरोमाः** | = आश्चर्यामुळे त्यांचे शरीर रोमांचित झाले. | **देवम्** | = विश्वरूप देवाला |
| **धनञ्जयः** | = अर्जुन | | | **शिरसा** | = मस्तक (झुकवून) |
| | | | | **प्रणम्य** | = प्रणाम करून |
| **विस्मयाविष्टः** | = फारच चकित झाले | **कृताञ्जलिः** | = (ते) हात | **अभाषत** | = म्हणाले |

* श्रीमद्भागवतात असा विषय आला आहे की, एका वेळी यशोदेने कन्हैय्याच्या लहानशा मुखात विश्वरूप पाहिले. ह्यावर विचार केला तर, अनंत कोटी ब्रह्मांडांपैकी एका ब्रह्माडांत एक भूमंडळ आहे. या भूमंडळात भारतवर्ष, भारत वर्षात एक मथुरामंडळ, मथुरामंडळात एक व्रजमंडळ, व्रजमंडळात एक नन्दगांव, नन्दगावात एक नन्दभवन आणि नन्दभवनात एका जागी लहानसा कन्हैय्या उभा आहे. त्या कन्हैय्याला यशोदा

*व्याख्या*— **ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः**— अर्जुनाने भगवंताच्या रूपाविषयी अशी कल्पनाही कधी केली नव्हती, असे रूप पाहून त्यांना फारच नवल वाटले. भगवंतांनी माझ्यावर कृपा करून आपल्या तर्फे मला विलक्षण अध्यात्मिक ज्ञान सांगितले आणि आता कृपा करून मला आपले विलक्षण रूप दाखवित आहेत—ह्या विचाराने प्रसन्न झाल्याने अर्जुनाचे शरीर रोमांचित झाले.

**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत**— भगवंताच्या विलक्षण कृपेला पाहून अर्जुनाच्या मनात असा भाव निर्माण झाला की, मी ह्याच्या मोबदल्यात कोणती कृतज्ञता प्रगट करू? माझ्याजवळ अशी कोणतीही वस्तू नाही की, मी ती ह्यांना अर्पण करू शकेन. मी तर केवळ नतमस्तकच होऊ शकतो अर्थात् मी स्वतःच आपण आपणाला अर्पित होऊ शकतो. म्हणून अर्जुन हात जोडून आणि नतमस्तक होऊन, प्रणाम करीत विश्वरूपी भगवंताची स्तुती करू लागले.

***संबंध***—*विराटरूपी भगवंताच्या ज्या विलक्षणतेला पाहून अर्जुन चकित झाले त्याचे वर्णन ते पुढील तीन श्लोकांत करत भगवंताची स्तुती करतात.*

*अर्जुन उवाच*

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान्।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥ १५॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देव** | = हे देव! (मी) | **भूतविशेषसङ्घान्** | = प्राण्यांच्या विशेष समुदायांना | **ईशम्** | = शंकरजींना |
| **तव** | = आपल्या | **च** | = आणि | **सर्वान्** | = संपूर्ण |
| **देहे** | = शरीरात | **कमलासनस्थम्** | = कमलासनावर बसलेल्या | **ऋषीन्** | = ऋषींना |
| **सर्वान्** | = संपूर्ण | **ब्रह्माणम्** | = ब्रह्मदेवांना | **च** | = आणि |
| **देवान्** | = देवतांना | | | **दिव्यान्** | = दिव्य |
| **तथा** | = तसेच | | | **उरगान्** | = सर्पांना |
| | | | | **पश्यामि** | = पाहत आहे. |

*व्याख्या*— **पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान्**—अर्जुनाची भगवंताकडून मिळालेली दिव्यदृष्टी इतकी विलक्षण आहे की, त्यांना देवलोकही समोर दिसत आहे. एवढेच नव्हे, तर त्यांना सर्व त्रैलोक्य दिसत आहे. केवळ त्रैलोक्यच नव्हे, तर त्रैलोक्याचे उत्पादक (ब्रह्मदेव), पालक (विष्णू) आणि संहारक (महेश) ही प्रत्यक्ष दिसत आहेत. म्हणून अर्जुन वर्णन करत आहेत की, मी संपूर्ण देवांना, प्राण्यांच्या समुदायांना आणि ब्रह्मदेव तसेच शंकरांना पाहत आहे.

**ब्रह्माणमीशं कमलासनस्थम्**—अर्जुन म्हणतात की, मी कमळावर स्थित असलेल्या ब्रह्मदेवाला पाहत आहे. यावरुन सिद्ध होते की, अर्जुन कमळाच्या दांडीला आणि दांडीचे उद्गमस्थान, अर्थात् मूळ आधार असलेल्या भगवान् विष्णूलाही (जे शेषशय्येवर झोपलेले आहेत) पाहत आहेत. याशिवाय भगवान् शंकराला, त्यांच्या कैलास पर्वताला आणि कैलास पर्वतावर स्थित असलेले त्यांचे निवासस्थान वटवृक्षालाही अर्जुन पाहत आहेत.

**ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्**—पृथ्वीवर राहणारे जितके ऋषी आहेत, त्यांना तसेच पाताळ लोकात राहणाऱ्या दिव्य सर्पांनाही अर्जुन पाहत आहेत.

या श्लोकात अर्जुनाच्या म्हणण्यावरुन हे सिद्ध होते की, त्यांना स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ हे त्रैलोक्य वेगवेगळे दिसत नाहीत तर विभागासह एकाच वेळी एकाच ठिकाणी दिसत आहेत—"**प्रविभक्तमनेकधा**" (११।१३) त्या त्रैलोक्या-वरुन जेव्हा अर्जुनाची दृष्टी बाजूला वळते, तेव्हा ज्याला ब्रह्मलोक, कैलास आणि वैकुंठलोक म्हणतात, त्या अधिकाऱ्यांचे अभीष्ट लोक तसेच त्यांचे स्वामी (ब्रह्मदेव, शंकर आणि विष्णू) ही अर्जुनाला दिसत आहेत. हा सर्व भगवत्प्रदत्त दिव्य दृष्टीचाच प्रभाव आहे.

---

माता हातात छडी घेऊन धमकावीत आहे की, "तू माती का खाल्लीस, दाखव तुझे तोंड" कन्हैय्याने आपले तोंड उघडून दाखविले तर त्या लहानशा मुखात यशोदा मातेने संपूर्ण जगताला-नन्दगावाला आणि नन्दभवनात आपले-आपणालाही पाहिले "सहात्मानम्" (श्रीमद्भागवत० १०।८।३९). त्याचप्रमाणे अर्जुनानेही भगवंताच्या शरीराच्या कोण्या एका अंशात संपूर्ण जगताला पाहिले.

## विशेष गोष्ट

जेव्हा भगवंतांनी म्हटले की, हे संपूर्ण जगत् माझ्या कोण्या एका अंशात स्थित आहे, तेव्हा अर्जुन ते दाखविण्याची प्रार्थना करतात. अर्जुनाच्या प्रार्थनेवरुन भगवान् म्हणतात की, तू माझ्या शरीरात एका ठिकाणी स्थित असलेल्या चराचर जगताला पहा—''**इह एकस्थं........मम देहे**'' (११।७). वेदव्यासांकडून दिव्यदृष्टी प्राप्त झालेले संजयसुद्धा हीच गोष्ट म्हणतात की, अर्जुनाने भगवंताच्या शरीरात एका ठिकाणी स्थित असलेल्या संपूर्ण जगताला पाहिले. ''**तत्र एकस्थं..........देवदेवस्य शरीरे**'' (११।१३) येथे अर्जुन म्हणतात की, मी आपल्या शरीरात संपूर्ण भूतसमुदाय इत्यादींना पाहत आहे ''**तव देव देहे**''. अशा प्रकारे भगवान् आणि संजयाच्या वचनात तर ''**एकस्थम्**'' (एका ठिकाणी स्थित) पद आले आहे; परंतु अर्जुनाच्या वचनात हे पद आले नाही. याचे कारण अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या शरीरातील ज्या कोण्या एका स्थानावर गेली की, तिथेच त्यांना भगवंताचे विश्वरूप दिसू लागले. त्यावेळी अर्जुनाची दृष्टी सारथीरूपी भगवंताच्या शरीराकडे गेलीच नाही. अर्जुनाची दृष्टी जेथे जाई तेथे त्यांना अनंत सृष्टी दिसू लागली. म्हणून अर्जुनाची दृष्टी तिकडेच वाहत गेली. म्हणून अर्जुन ''**एकस्थम्**'' म्हणू शकले नाहीत. ते ''**एकस्थम्**'' तेव्हाच म्हणू शकले असते, जेव्हा विश्वरूपाबरोबरच सारथीरूपाने भगवंताचे शरीरसुद्धा त्यांना दिसले असते. अर्जुनाला केवळ विश्वरूपच दिसत आहे, म्हणून ते विश्वरूपाचेच वर्णन करत आहेत. त्यांना विश्वरूप इतके अपार दिसत आहे की, त्याची देश किंवा काल याची काही सीमाच दिसत नाही. तात्पर्य, जर अर्जुनाच्या दृष्टीत विश्वरूपाचाच अंत लागत नव्हता तर त्यांची दृष्टी सारथीरूपी बसलेल्या भगवंताकडे जाईलच कशी?

भगवान् तर आपल्या शरीराच्या एका देशात विश्वरूप दाखवित आहेत. म्हणून त्यांनी ''**एकस्थम्**'' म्हटले आहे. संजय सारथीरूपाने बसलेल्या भगवंताला आणि त्यांच्या शरीराच्या एका देशात स्थित असलेल्या विश्वरूपाला पाहत आहेत. म्हणून संजयाने ''**एकस्थम्**'' पद दिले आहे*.

आता प्रश्न असा येतो की, भगवान् आणि संजयाच्या दृष्टीत ती एक जागा कोणती होती, ज्या ठिकाणी अर्जुन विश्वरूप पाहत होते? याचे उत्तर भगवंताच्या शरीरात अमुक एका ठिकाणीच अर्जुनाने विश्वरूप पाहिले होते, याचा निर्णय केला जाऊ शकत नाही. कारण भगवंताच्या शरीरातील एका एका रोमात अनंत कोटी ब्रह्मांड विद्यमान आहेत.† भगवंतांनीही हे म्हटले होते की, माझ्या शरीराच्या एका देशात तू चराचरासह संपूर्ण जगताला पाहून घे (११।७). म्हणून जेथे अर्जुनाची दृष्टी एक वेळ पडली तेथेच त्यांना संपूर्ण विश्वरूप दिसू लागले.

**परिशिष्ट भाव**—अर्जुन भगवंताच्या विराटरूपात देवता, प्राणी, ब्रह्माजी, विष्णूजी, शंकरजी, ऋषी, नाग—या सर्वांचा समूह पाहत आहेत. तात्पर्य, अर्जुन मृत्युलोकात बसूनच देवलोक, ब्रह्मलोक, वैकुंठ, कैलास, नागलोक इत्यादी लोक पाहत आहेत. म्हणून जे काही सांगण्यात-ऐकण्यात येते ते सर्वचे सर्व भगवंताच्या एका अंशात स्थित आहे. भगवान् साकार असोत अथवा निराकार, असोत; मोठ्यात मोठे असोत अथवा लहानात लहान असोत त्यांचे अनंतपण मिटत नाही. संपूर्ण सृष्टी त्यांचेपासूनच उत्पन्न होते, त्यांच्यातच राहते आणि शेवटी त्यांच्यातच लीन होते, परंतु भगवान् तसेच्या तसेच राहतात!

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप॥ १६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **विश्वरूप** | = हे विश्वरूप! | **सर्वतः** | = सर्व बाजूंनी | **न** | = न |
| **विश्वेश्वर** | = हे विश्वेश्वर! | **अनन्त रूपम्** | = अनंत रूप असलेले | **मध्यम्** | = मध्य |
| **त्वाम्** | = आपणास (मी) | **पश्यामि** | = पाहत आहे | **पुनः** | = आणि |
| **अनेकबाहूदर-** | = अनेक हात, उदर | **तव** | = (मी) आपला | **न** | = न |
| **वक्त्रनेत्रम्** | मुख आणि डोळे | **न** | = न | **अन्तम्** | = अंतही |
| | असलेले (तसेच) | **आदिम्** | = आदि, | **पश्यामि** | = पाहत आहे |

* भगवान् आणि संजयाच्या वचनात ''एकस्थम्'' पद आल्याने हे समजून घ्यावयास पाहिजे की, अर्जुनानेही भगवंताच्या शरीरात एका ठिकाणीच संपूर्ण विश्वरूपाला पाहिले.

† (१) रोम रोम प्रति लागे कोटि कोटि ब्रह्मंड (मानस १।२०१)

(२) क्वेदृग्विधाविगणिताण्डपराणुचर्यावाताध्वरोमविवरस्य च ते महित्वम्॥ (श्रीमद्भा० १०।१४।११) 'झरोक्यातून आलेल्या सूर्य किरणांत लहान लहान रजः कणांचे परमाणू जसे उडत असलेले दिसतात, तसे अगणित ब्रह्मांड आपल्या एका एका रोम छिद्रात उडत-पडत राहत असतात.'

*व्याख्या*— **विश्वरूप, विश्वेश्वर**—या दोन संबोधनाचे तात्पर्य, मला जे काही दिसत आहे, ते सर्व आपणच आहात आणि या विश्वाचे स्वामीही आपणच आहात. सांसारिक मनुष्यांची शरीरे तर जड असतात आणि त्यात शरीरी चेतन असतो परंतु आपल्या विराटरूपात शरीर आणि शरीरी हे दोन विभाग नाहीत. विराटरूपात शरीर आणि शरीरीरूपाने एक आपणच आहात. म्हणून विराटरूपात सर्व काही चिन्मयच चिन्मय आहे. तात्पर्य, अर्जुन "विश्वरूप" संबोधन देऊन हे म्हणत आहेत की, आपणच शरीर आहात आणि "विश्वेश्वर" संबोधन देऊन म्हणत आहेत की, आपणच शरीरी (शरीराचे स्वामी) आहात.

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रम्**—मी आपल्या हाताकडे जेव्हा पाहतो तेव्हा आपले हात अनेक दिसतात, पोटाकडे पाहतो तेव्हा पोट अनेक दिसतात, मुखाकडे पाहतो तेव्हा मुखे अनेक दिसतात, डोळ्याकडे पाहतो तेव्हा डोळे अनेक दिसतात. तात्पर्य, आपल्या हात, पोट, मुख आणि नेत्र यांचा काही अंत लागत नाही, हे सर्व अनंत आहेत.

**पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्**—आपण देश, काल, वस्तू, व्यक्ती, पदार्थ इत्यादींच्या रूपात चारीही बाजूंनी अनंतच अनंत दिसत आहात.

**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिम्**—आपला आदि कोठे आहे, मध्य कोठे आहे आणि अंत कोठे आहे याचा पत्ताच लागत नाही.

सर्वात प्रथम "**नान्तम्**" म्हणण्याचे तात्पर्य, जेव्हा एखादा एखाद्याला पाहतो तेव्हा त्याची दृष्टी सर्वप्रथम त्याच्या सीमेवर जाते की, हा केवढा आहे. जसे एखाद्या पुस्तकाकडे पाहिले तर, प्रथम ते पुस्तक किती जाड आहे ? त्याची लांबी, रुंदी याकडे लक्ष जाते. तसेच भगवंताचे विराटरूप पाहताना अर्जुनाची दृष्टी सर्वप्रथम त्यांच्या सीमे (अंता)-कडे गेली. जेव्हा अर्जुनाला त्याचा अंत लागला नाही, तेव्हा त्यांची दृष्टी मध्यावर गेली, नंतर आदि (आरंभ) कडे गेली. परंतु कुठेही विराटरूपाच्या अंत, मध्य आणि आदिचा पत्ता लागला नाही. म्हणून या श्लोकात "**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिम्**" हा क्रम म्हटला गेला आहे.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवंताच्या विराटरूपाच्या अनंततेचे वर्णन झाले आहे. भगवंताच्या एका अंशातही अनंतता आहे. जसे शाईमध्ये कोणत्या जागी कोणती लीपी नाही? सोन्यात कोणत्या जागी कोणता अलंकार नाही? तसेच भगवंतामध्ये काय नाही? अर्थात् भगवंतामध्ये स्वाभाविक सर्व काही आहे.

## किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम्।
## पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्॥ १७॥

**त्वाम्** = (मी) आपणाला
**किरीटिनम्** = किरीट (मुकुट),
**गदिनम्** = गदा,
**चक्रिणम्** = चक्र (तसेच शंख आणि पद्म) धारण केलेले
**पश्यामि** = पाहत आहे.
(आपणाला)
**तेजोराशिम्** = तेजाची राशी
**सर्वतः** = सर्वत्र
**दीप्तिमन्तम्** = प्रकाश करणारे
**दीप्तानलार्कद्युतिम्** = देदीप्यमान अग्नी आणि सूर्यासमान कान्तिमान्,
**दुर्निरीक्ष्यम्** = डोळ्याने पाहण्यास अत्यंत कठीण
**च** = आणि
**समन्तात्** = सर्व प्रकारे
**अप्रमेयम्** = अप्रमेयस्वरूप (पाहत आहे.)

*व्याख्या*— **किरीटिनं गदिनं चक्रिणं च**—आपणाला मी मुकुट, गदा आणि चक्र धारण केलेले पाहत आहे. येथे "च" पदाने शंख आणि पद्मालाही घेतले पाहिजे. याचे तात्पर्य, अर्जुनाला विश्वरूपात भगवान् विष्णूचे चतुर्भुज रूपही दिसत आहे.

**तेजोराशिम्**—आपण तेजाची राशी आहात. जणू तेजाचा समूहच एकत्र (अनंत तेज) झाला आहे. याचे पूर्वी संजयाने वर्णन केले आहे की, आकाशात एकाच वेळी हजारो सूर्य जरी उदय पावले तरीही भगवंताच्या तेजाची बरोबरी करू शकत नाहीत. (११।१२) असे आपण प्रकाशस्वरूप आहात.

**सर्वतो दीप्तिमन्तम्**—स्वतः प्रकाशस्वरूप असल्याने आपण चहू बाजूंनी प्रकाश करत आहात.

**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्**—अत्यंत दैदिप्यमान अग्नी आणि सूर्यासमान आपली कान्ती आहे. जसे सूर्याच्या प्रकाशापुढे डोळे दीपून जातात तसेच आपणाला पाहिले असता डोळे दीपून जात आहेत. म्हणून आपण पाहण्यास कठीण आहात. आपणाला योग्य रीतीने पाहणे शक्य नाही.

[या ठिकाणी एक मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे की, भगवंतांनी अर्जुनाला दिव्य दृष्टी दिली होती; परंतु ते दिव्य दृष्टी असणारे अर्जुनही विश्वरूपाला पाहण्यास पुरेसे समर्थ नाहीत. असे दैदिप्यमान भगवंताचे स्वरूप आहे]

आपण सर्व प्रकारे अप्रमेय (अपरिमित) आहात अर्थात् आपण मापाचा विषयच नव्हेत. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ती, अनुपलब्धी इत्यादी कोणतेही प्रमाण आपणाला लागू पडत नाही. कारण प्रमाणात शक्ती आपलीच आहे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाला विराटरूपात चतुर्भुजरूपही दिसत आहे—**'किरीटिनं गदिनं चक्रिणं च'**

**'अप्रमेयम्'**—परमात्म्याचे सगुण-निर्गुण, साकार-निराकार सर्वच रूप अप्रमेय (अपरिमित) आहे आणि त्यांचा अंश जीवात्माही अप्रमेय आहे— **'अनाशिनोऽप्रमेयस्य'** (गीता २। १८). ते परमात्मा ज्ञानाचा विषय नाहीत, कारण ते ज्ञानाचेही ज्ञाता आहेत—**'वेदान्तकृद्वेदविदेव चाहम्'** (गीता १५। १५)

**'दुर्निरीक्ष्यम्'**—भगवंताद्वारा प्रदत्त दिव्य दृष्टी असूनही अर्जुन भगवंताच्या विराटरूपाला पाहण्यास पूर्ण समर्थ होत नाहीत. यावरुन सिद्ध होते की, भगवंताच्या दिलेल्या शक्तीने सुद्धा भगवंताला पूर्ण जाणू शकत नाहीत. भगवान्‌ही स्वत:ला पूर्ण जाणत नाहीत, जर जाणले तर ते अनंत कसे राहतील?

***संबंध**—आता पुढील श्लोकात अर्जुन भगवंताला निर्गुण-निराकार, सगुण-निराकार आणि सगुण-साकाररूपात पाहत स्तुती करत आहेत.*

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**
**त्वमव्यय: शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे॥१८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वम्** | = आपण (च) | **विश्वस्य** | = संपूर्ण विश्वाचे | **त्वम्** | = आणि आपण (च) |
| **वेदितव्यं** | = जाणून घेण्यायोग्य | **परम्** | = परम | **अव्यय:** | = अविनाशी |
| **परमम्** | = परम | **निधानम्** | = आश्रय आहात, | **सनातन:** | = सनातन |
| **अक्षरम्** | = अक्षर(अक्षरब्रह्म) आहात, | **त्वम्** | = आपण (च) | **पुरुष:** | = पुरुष आहात (-असे) |
| **त्वम्** | = आपण (च) | **शाश्वत धर्मगोप्ता** | = सनातन धर्माचे रक्षक आहात | **मे** | = मी |
| **अस्य** | = या | | | **मत:** | = मानतो. |

*व्याख्या* —**त्वमक्षरं परमं वेदितव्यम्**— वेद, शास्त्र, पुराण, स्मृती, संतवाणी आणि तत्त्वज्ञ जीवन्मुक्त महापुरुष यांच्याद्वारा जाणून घेण्यायोग्य जे परमानंद स्वरूपी अक्षरब्रह्म आहे, ज्याला निर्गुण-निराकार म्हणतात, ते आपणच आहात.

**त्वमस्य विश्वस्य परं निधानम्**—पाहणे, ऐकणे आणि समजून घेण्यात जो काही संसार येत असतो, त्या संसाराचे परम आश्रय, आधार आपणच आहात. जेव्हा महाप्रलय होत असतो, तेव्हा संपूर्ण संसार कारणासह आपल्यात लीन होत असतो आणि मग महासर्गाच्या आदि आपल्या पासूनच प्रगट होत असतो. अशा प्रकारे आपण या संसाराचे परमनिधान आहात [या पदाने अर्जुन सगुण-निराकाराचे वर्णन करत स्तुती करत आहेत.]

**त्वं शाश्वतधर्मगोप्ता**—जेव्हा धर्माची हानी आणि अधर्माची वृद्धी होत असते तेव्हा आपणच अवतार घेऊन अधर्माचा नाश करून सनातन धर्माचे रक्षण करत असता. [या पदाने अर्जुन सगुण-साकाराचे वर्णन करत स्तुती करत आहेत.]

**अव्यय: सनातनस्त्वं पुरुषो मतो मे**—अव्यय अर्थात् अविनाशी, सनातन आदिरहित, सर्वकाळ राहणारे उत्तम पुरुष आपणच आहात, असे मी समजतो.

**परिशिष्ट भाव**—येथे **'त्वमक्षरं परमं वेदितव्यं'** पदांनी निर्गुण-निराकाराची गोष्ट आली आहे, **'त्वमस्य विश्वस्य परं निधानम्'** पदांनी सगुण-निराकाराचे वर्णन झाले आणि **'त्वं शाश्वत धर्मगोप्ता'** पदांनी सगुण-साकारबद्दल सांगितले आहे. तात्पर्य, निर्गुण-निराकार, सगुण-साकार आणि सगुण-निराकार—हे सर्व मिळून भगवंताचे समग्ररूप आहे, जे जाणले असता मग काहीही जाणून घ्यावयाचे शिल्लक राहत नाही (गीता ७। २). कारण त्याच्याशिवाय दुसरे काही नाहीच.

***संबंध**— पंधराव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत आश्चर्यचकित करणाऱ्या देवरूपाचे वर्णन करून, आता पुढील दोन श्लोकांत अर्जुन त्या विश्वरूपाची उग्रता, प्रभाव, सामर्थ्याचे वर्णन करत आहेत.*

**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम्।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्॥ १९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वाम्** | = आपणाला (मी) | | बाहू असलेले, | **स्वतेजसा** | = आपल्या तेजाने |
| **अनादिम-** | = आदि, मध्य आणि | **शशिसूर्यनेत्रम्** | = चंद्रमा आणि सूर्यरूपी | **इदम्** | = या |
| **ध्यान्तम्** | अंतरहित, | | नेत्र असलेले, | **विश्वम्** | = संसाराला |
| **अनन्तवीर्यम्** | = अनंत प्रभावशाली, | **दीप्तहुताश-** | = प्रज्वलित अग्निरूप | **तपन्तम्** | = तप्त करीत असलेले |
| **अनन्तबाहुम्** | = अनंत | **वक्त्रम्** | मुख असलेले (आणि) | **पश्यामि** | = पाहत आहे. |

*व्याख्या*— **अनादिमध्यान्तम्**—आपण आदि, मध्य आणि अंतरहित आहात, अर्थात् आपण अमर्याद, असीम आहात.

सोळाव्या श्लोकातही अर्जुनाने म्हटले आहे की, मला आपला आदि, मध्य आणि अंत दिसत नाही. त्या ठिकाणी तर ''देशकृत'' अनंततेचे वर्णन झाले आहे आणि येथे ''काळकृत'' अनंततेचे वर्णन झाले आहे. तात्पर्य देशकृत, काळकृत, वस्तुकृत, इत्यादी कोणत्याही प्रकारे आपली सीमा नाही. संपूर्ण देश, काळ, इत्यादी आपल्या अंतर्गत आहेत, मग आपण देश, काळाच्या अंतर्गत कसे येऊ शकाल? अर्थात् देश, काळ इत्यादी कोणत्याही मापाने आपल्याला मोजले जाऊ शकत नाही.

**अनन्तवीर्यम्**—आपल्या ठिकाणी अपार पराक्रम, सामर्थ्य, बल आणि तेज आहे. आपण अनन्त, असीम शक्तिशाली आहात.

**अनन्तबाहुम्**— *आपले किती बाहू आहेत, याची गणतीच लागू शकत नाही. आपण अनन्तभुजा असणारे आहात.

**शशिसूर्यनेत्रम्**—संपूर्ण संसाराला प्रकाशित करणारे जे चंद्र आणि सूर्य आहेत, ते आपले नेत्र आहेत. म्हणून संपूर्ण संसाराला आपल्यापासूनच प्रकाश मिळत असतो.

**दीप्तहुताशवक्त्रम्**—यज्ञ, होम इत्यादीत जे काही अग्नीत हवन केले जाते, त्या सर्वाला ग्रहण करणारे दैदिप्यमान् मुख असणारे आपणच आहात.

**स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्**—आपल्या तेजाने संपूर्ण विश्वाला तापविणारे आपणच आहात. तात्पर्य, ज्या वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादींनी प्रतिकूलता प्राप्त होत आहे, त्याने संपूर्ण प्राणी संतप्त होत आहेत. संतप्त करणारे आणि संतप्त होणारे—दोन्हीही एकाच विराटरूपाची अंग आहेत.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकाचे तात्पर्य हे आहे की, भगवन् सर्व प्रकाराने अनंत आहेत. त्यांच्या तेजाने तप्त होणारा संसार भगवंतापासून वेगळा नाही. म्हणून तप्त करणारा आणि तप्त होणारा—दोन्हीही भगवंताची स्वरूपे आहेत. भगवान् म्हणतात—

**मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपीन्द्रियैः।**
**अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्व मञ्जसा॥** (श्रीमद्भा० ११। १३। २४)

'मनाने, वाणीने दृष्टीने आणि अन्य इंद्रियांनी जे काही (शब्दादी विषय) ग्रहण केले जातात, ते सर्व मीच आहे. म्हणून माझ्याशिवाय दुसरे काहीही नाही—हा सिद्धान्त तुम्ही विचारपूर्वक शीघ्र समजून घ्या अर्थात् स्वीकार करून अनुभव करा.'

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महात्मन्** | = हे महात्मन्! | **सर्वाः** | = संपूर्ण | **अद्भुतम्** | = अद्भुत (आणि) |
| **इदम्** | = हे | **दिशः** | = दिशा | **उग्रम्** | = उग्र |
| **द्यावापृथिव्योः** | = स्वर्ग आणि पृथ्वीच्या | **एकेन** | = एका | **रूपम्** | = रूपाला |
| | | **त्वया, हि** | = आपल्यानेच | **दृष्ट्वा** | = पाहून |
| **अन्तरम्** | = मधले अंतराळ | **व्याप्तम्** | = परिपूर्ण आहेत. | **लोकत्रयम्** | = तिन्ही लोक |
| | | **तव** | = आपल्या | **प्रव्यथितम्** | = व्यथित (व्याकूळ) होत आहेत. |
| **च** | = आणि | **इदम्** | = या | | |

* सोळाव्या श्लोकात अर्जुनाने ''अनेकबाहूदरववक्त्रनेत्रम्'' म्हटले आणि येथेही ''अनन्तबाहुम्'' म्हणत आहेत तर यात पुनरुक्ती झाल्यासारखे वाटते. परंतु ही वास्तविक पुनरुक्ती नव्हे, कारण तेथे विराटरूप भगवंताचे देवरूपाने वर्णन आहे आणि येथे उग्ररूपाचे वर्णन आहे. उग्ररूपाचे वर्णन असल्यानेच येथे ''विश्वमिदं तपन्तम्'' आणि पुढील (वीसाव्या) श्लोकात ''दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितम्'' अशी पदे आलेली आहेत.

*व्याख्या*—**महात्मन्**—या संबोधनाचे तात्पर्य, आपल्या स्वरूपासारखे कोणाचेच स्वरूप नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही. म्हणून आपण ''महात्मा'' अर्थात् महान् स्वरूप असणारे आहात.

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः**—स्वर्ग आणि पृथ्वीच्या मध्यभागी जेवढे अवकाश आहे, पोकळी आहे ती सर्व पोकळी आपण व्यापलेली आहे.

पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, पूर्व व उत्तरेच्या मध्यभागी ''ईशान्य'', उत्तर व पश्चिमेच्या मध्यभागी ''वायव्य'', पश्चिम व दक्षिणेच्या मध्यभागी ''नैर्ऋत्य'' आणि दक्षिण व पूर्वेच्या मध्यभागी ''आग्नेय'' तसेच वर आणि खाली इत्यादी संपूर्ण दहाही दिशा आपल्या ह्या स्वरूपानेच व्यापलेल्या आहेत अर्थात् या सर्वांत आपणच आपण विद्यमान आहात.

**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितम्**—[एकोणीसाव्या श्लोकात तसेच वीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धात उग्ररूपाचे वर्णन करून, आता वीसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धापासून बावीसाव्या श्लोकापर्यंत अर्जुन उग्ररूपाच्या परिणामाचे वर्णन करतात.] आपल्या ह्या अद्भुत, विलक्षण, अलौकिक, आश्चर्यजनक, अत्यंत दैदिप्यमान् आणि भयंकर उगरूपाला पाहून स्वर्ग, मृत्यू आणि पाताळ लोकात राहणारे सर्व प्राणी व्यथित होत आहेत, भयभीत होत आहेत.

जरी या श्लोकात स्वर्ग आणि पृथ्वीचीच गोष्ट आली आहे, (**द्यावापृथिव्योः**), तरीही अर्जुनाने ''**लोकत्रयम्**'' म्हटल्यामुळे, येथे पाताळही घेऊ शकता येते. कारण अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या शरीराच्या ज्या, एका देशात जात आहे, तेथे अर्जुनाला जे दिसत आहे, ते दृष्य कधी पाताळाचे आहे, कधी मृत्युलोकाचे आहे आणि कधी स्वर्गाचे आहे. अशा प्रकारे अर्जुनाच्या दृष्टीसमोर सर्व दृष्य क्रमरहित येत आहेत.*

या ठिकाणी ही शंका येते की, जर विराटरूपाला पाहून त्रैलोक्य व्यथित होत आहे, तर दिव्य दृष्टीशिवाय त्रैलोक्याने विराटरूपाला कसे पाहिले? भगवंतानी तर केवळ अर्जुनाला दिव्यदृष्टी दिली होती. त्रैलोक्याला विराटरूप पाहण्यासाठी दिव्य दृष्टी कोणी दिली ? कारण प्राकृत चर्मचक्षूंनी हे विराटरूप पाहिले जाऊ शकत नाही; कारण ''**विश्वमिदं तपन्तम्**'' (११।१९) आणि ''**लोकत्रयं प्रव्यथितम्**'' पदाने विराटरूपाला पाहून त्रैलोक्य संतप्त आणि व्यथित होत असल्याचे अर्जुनाने म्हटले आहे.

याचे समाधान असे आहे की, संतप्त आणि व्यथित होणारे त्रैलोक्यही त्या विराटरूपाच्या अंतर्गतच आहे; अर्थात् विराटरूपाचेच अंग आहे. संजयाने आणि भगवंतांनी विराटरूपाला एका देशात पाहण्याविषयी (**एकस्थम्**) म्हटले, परंतु अर्जुनाने एका देशात पाहण्याची गोष्ट म्हटली नाही. कारण विराटरूप पाहत असताना भगवंताच्या शरीराकडे अर्जुनाचे लक्षच गेले नाही. त्यांची दृष्टी केवळ विराटरूपाकडेच वाहत गेली. जर सारथिरूपी भगवंताच्या शरीराकडेही अर्जुनाची दृष्टी गेली नाही तर संतप्त आणि व्यथित होणाऱ्या ह्या लौकिक संसाराकडे अर्जुनाची दृष्टी जाईलच कशी? यावरुन सिद्ध झाले की, संतप्त होणारा आणि संतप्त करणारा तसेच व्यथित होणारा आणि व्यथित करणारा ही चारीही त्या विराटरूपाचीच अंग आहेत. अर्जुनाला असे दिसत आहे की, त्रैलोक्य विराटरूपाला पाहून व्यथित, भयभीत होत आहे. परंतु वास्तविक (विराटरूपाच्या अंतर्गत) भयानक सिंह, व्याघ्र, सर्प इत्यादी जन्तूंना आणि मृत्यूला पाहून त्रैलोक्य भयभीत होत आहे.

## मार्मिक संकेत

पाहणे, ऐकणे आणि समजण्यात येणारा संपूर्ण संसार भगवंताच्या दिव्य विराटरूपाचेच एक लहानसे अंग आहे. संसारात जी जडता, परिवर्तनशीलता, अदिव्यता दिसत असते, ती वस्तुतः दिव्य विराटरूपाचीच एक झलक आहे, एक लीला आहे. विराटरूपाची जी दिव्यता आहे, त्याची तर स्वतंत्र सत्ता आहे; परंतु संसाराची जी अदिव्यता आहे, त्याची स्वतंत्र सत्ता नसते. अर्जुनाला तर दिव्य दृष्टीमुळे भगवंताचे विराटरूप दिसले. परंतु भक्तांना भावदृष्टीने हा संसार भगवत्स्वरूप दिसत असतो. ''**वासुदेवः सर्वम्**''. तात्पर्य, जसे बालपणी बालकाला खड्या गोट्याचे जे आकर्षण असते, ते मोठे झाल्यावर राहत नसते. मोठे झाल्यावर त्याला खडे-गोटे आकृष्ट करत नाहीत. तसेच भोगदृष्टी असताना जो भाव राहत असतो,

* अर्जुनाने स्वर्गापासून पाताळापर्यंत आणि पाताळापासून स्वर्गापर्यंत क्रमाने विश्वरूप पाहिले असे नव्हे. अर्जुन भगवंताकडून मिळालेल्या दिव्य दृष्टीने स्वर्ग, भूमंडळ, पाताळ इत्यादी सर्वांना एकाच वेळी पाहत आहेत आणि जसे पाहत आहेत तसेच बोलत आहेत., हे देवा, मी आपल्या देहाचे ठिकाणी देवतांना पाहत आहे, प्राण्यांच्या वेगवेगळ्या समुदायांना पाहत आहे, कमळावर विद्यमान असलेल्या ब्रह्मदेवांना पाहत आहे, कैलासात वास्तव्य करणारे शंकर त्यांना पाहत आहे, संपूर्ण ऋषींना पाहत आहे, दिव्य सर्पांना पाहत आहे (११।१५) इत्यादी इत्यादी. अर्जुनाला असे सांगण्यास वेळ लागत होता पण असे (एकाच वेळी) पाहण्यास वेळ लागत नव्हता. म्हणून अर्जुनाच्या बोलण्यात स्वर्ग, मृत्यू, पाताळ इत्यादी लोकांचा क्रम नाही.

तो भाव भोगदृष्टी समाप्त झाल्यावर राहत नाही.

ज्यांची भोगदृष्टी असते त्यांना संसार सत्य दिसत असतो, परंतु ज्यांची भोगदृष्टी नसते अशा महापुरुषांना संसार भगवत्स्वरूप दिसत असतो. जसे एकच स्त्री बालकाला आईच्या रूपात, पित्याला मुलीच्या रूपात, पतीला पत्नीच्या रूपात आणि सिंहाला भोजनाच्या रूपात दिसत असते, तसेच हा संसार ''चर्मदृष्टी'' ने सत्य, ''विवेकदृष्टी'' ने परिवर्तनशील, ''भावदृष्टी'' ने भगवत्स्वरूप आणि ''दिव्यदृष्टी'' ने विराटरूपाचेच एक लहानसे अंग दिसत असते.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात आलेल्या 'त्वयैकेन' पदाचे तात्पर्य हे आहे की, असंख्यरूपात एक आपणच आहात—**'वासुदेवः सर्वम्'** आपल्या अनेक रूपांची कोणी गणना करू शकत नाही, परंतु त्यात मात्र आहात आपण एकच!

भगवंतात अनेक प्रकारची अद्भुतता आहे. ते देश, काळ, वस्तू, व्यक्ती, रूप, ज्ञान, योग इत्यादी सर्व दृष्टींनी अनंत आहेत. जे आपण पाहिले नाही ऐकले नाही, जाणले नाही, समजले नाही आणि जे आपल्या कल्पनेत आलेच नाही ते सर्व विराटरूपाच्या अंतर्गत आहे.

*संबंध—आता अर्जुनाच्या दृष्टीसमोर (विराटरूपात) स्वर्गादी लोकांचे दृष्य येते आणि ते त्याचे वर्णन पुढील दोन श्लोकांत करतात.*

**अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः॥ २१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अमी, हि** | = तेच | **प्राञ्जलयः** | = हात जोडून (आपल्या नामांचे व गुणांचे) | **इति** | = असे |
| **सुरसङ्घाः** | = देवतांचे समुदाय | | | **उक्त्वा** | = म्हणून |
| **त्वाम्** | = आपल्यात | **गृणन्ति** | = कीर्तन करीत आहेत. | **पुष्कलाभिः** | = उत्तम उत्तम |
| **विशन्ति** | = प्रविष्ट होत आहेत. | **महर्षि** | = महर्षी आणि | **स्तुतिभिः** | = स्तोत्राने |
| **केचित्** | = (त्यापैकी) कित्येक तर | **सिद्धसङ्घाः** | सिद्धांचे समुदाय | **त्वाम्** | = आपली |
| | | **स्वस्ति** | = कल्याण हो! मंगल हो! | **स्तुवन्ति** | = स्तुती करीत आहेत. |
| **भीताः** | = भयभीत होऊन | | | | |

***व्याख्या*— अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति**—जेव्हा अर्जुन स्वर्गात गेले होते त्यावेळी त्यांचा ज्या देवतांशी परिचय झाला होता, त्याच देवतांसाठी येथे अर्जुन म्हणत आहेत की, तेच देवतालोक आपल्या स्वरूपात प्रविष्ट होत असलेले दिसत आहेत. ह्या सर्व देवता आपल्यापासूनच उत्पन्न होतात, आपल्यातच स्थित राहतात आणि आपल्यातच प्रविष्ट होत असतात.

**केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति**—परंतु त्या देवतांपैकी ज्यांचे आयुष्य अजून जास्त शिल्लक आहे, अशा अजाण देवता, (विराटरूपाच्या अंतर्गत) नृसिंह इत्यादी भयानक रूपांना पाहून, भयभीत होऊन हात जोडून आपल्या नाम, लीला, रूप, गुण, इत्यादीचे गान करीत आहेत.

जरी देवतालोक नृसिंह इत्यादी अवतारांना पाहून आणि काळरूपी मृत्यूपासून भयभीत होऊनच भगवंताचे गुणगान करत आहेत, (जे सर्व विराटरूपाचीच अंग आहेत) परंतु अर्जुनाला असे वाटत आहे की, ते विराटरूप भगवंताला पाहूनच भयभीत होऊन स्तुती करत आहेत.

**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः**—सप्तऋषी, देवर्षी, महर्षी, सनकादी आणि देवताद्वारा स्वस्तिवाचन (कल्याण हो, मंगल हो) होत आहे आणि खूपच उत्तम उत्तम स्तोत्रांनी आपली ते स्तुती करत आहेत.

**परिशिष्ट भाव**—देवता, महर्षी, सिद्ध इत्यादी सर्व भगवंताच्याच विराटरूपाचे अंग आहेत. म्हणून प्रविष्ट होणारे, भयभीत होणारे, भगवंताच्या नाम आणि गुणांचे कीर्तन करणारे तसेच स्तुती करणारे हे सर्वच भगवान् आहेत आणि ज्याच्यात प्रविष्ट होत आहेत, ज्यांच्यापासून भयभीत होत आहेत, ज्यांच्या नाम आणि गुणांचे कीर्तन करीत आहेत आणि ज्यांची स्तुती करीत आहेत तेही भगवान् आहेत. ही भगवंताच्या सगुण रूपाची विलक्षणता आहे!

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च।**
**गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे॥ २२॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ये | = जे | अश्विनौ | = दोन अश्विनीकुमार, | च | = आणि |
| रुद्रादित्याः | = अकरा रुद्र, बारा आदित्य, | च | = तसेच | गन्धर्वयक्षासुर-सिद्धसङ्घाः | = गन्धर्व, यक्ष, असुर आणि सिद्धांचे समुदाय आहेत, |
| वसवः | = आठ वसू, | मरुतः | = एकोणपन्नास मरुद्गण | सर्वे, एव | = (ते) सर्वच |
| साध्याः | = बारा साध्यगण, | च | = व | विस्मिताः | = चकित होऊन |
| विश्वे | = दहा विश्वेदेव | उष्मपाः | = गरम-गरम भोजन करणारे (सात पितृगण) | त्वाम् | = आपणाला |
| च | = आणि | | | वीक्षन्ते | = पाहत आहेत. |

*व्याख्या*— **रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च**—अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसू, दोन अश्विनीकुमार आणि एकोणपन्नास मरुद्गण या सर्वांची नावे याच अध्यायाच्या सहाव्या श्लोकाच्या व्याख्येत दिली गेली आहेत. म्हणून त्या ठिकाणी पाहून घ्यावे.

मन, अनुमन्ता, प्राण, नर, यान, चित्ति, हय, नय, हंस, नारायण, प्रभव आणि विभु हे बारा "साध्य" आहेत (वायु पुराण ६६।१५-१६)

क्रतु, दक्ष, श्रव, सत्य, काल, काम, धुनि, कुरुवान्, प्रभवान् आणि रोचमान् हे दहा "विश्वेदेव" आहेत (वायु पुराण ६६।३१-३२)

कव्यवाह, अनल, सोम, यम, अर्यमा, अग्निष्वात्त आणि बर्हिषत्. हे सात "पितर" आहेत (शिव पुराण धर्म० ६३।२). उष्म अर्थात् गरम अन्न खाण्यामुळे पितरांचे नाव "उष्मपा" पडले आहे.

**गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घाः**—कश्यपांच्या पत्नी मुनि आणि प्राधा तसेच अरिष्टा ह्यांच्यापासून गन्धर्वांची उत्पत्ती झाली आहे. गन्धर्वलोक राग रागिण्यात अत्यंत चतुर असून स्वर्गातील गायक आहेत.

कश्यपांच्या खसा पत्नीपासून यक्षांची उत्पत्ती झाली आहे.

देवतांचे विरोधी *दैत्य, दानव आणि राक्षसांना असुर म्हणतात. कपिल इत्यादींना सिद्ध म्हणतात.

**वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे**—उपर्युक्त सर्व देवता, पितर, गन्धर्व, यक्ष, इत्यादी चकित होऊन आपणाला पाहत आहेत. या सर्व देवता इत्यादी विराटरूपाचीच अंग आहेत

**परिशिष्ट भाव**—रुद्र, आदित्य, वसू, साध्यगण, विश्वेदेव इत्यादी सर्वचे सर्व एका भगवंताच्या समग्ररूपाचेच अंग आहेत. म्हणून पाहणारे आणि दिसणारे सर्व एक परमात्माच आहेत.

*संबंध—आता अर्जुन पुढील तीन श्लोकांत विश्वरूपाच्या भयंकर विकराळ रूपाचे वर्णन करून त्याचा परिणाम सांगतात.*

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम्।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम्॥ २३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| महाबाहो | = हे महाबाहो! | बहूदरम् | = पुष्कळ उदर असलेल्या (आणि) | दृष्ट्वा | = पाहून |
| ते | = आपल्या | बहुदंष्ट्राकरालम् | = भयंकर दाढा असलेल्या | लोकाः | = सर्व प्राणी |
| बहुवक्त्रनेत्रम् | = पुष्कळ मुख आणि नेत्र असलेल्या, | महत् | = महान | प्रव्यथिताः | = व्यथित होत आहेत |
| बहुबाहूरुपादम् | = पुष्कळ भुजा, जंघा आणि पाय असलेल्या, | रूपम् | = रूपाला | तथा | = तसेच |
| | | | | अहम् | = मीही (व्यथित होत आहे). |

*व्याख्या*— [पंधराव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत विश्वरूपात "देव" रूपाचे, एकोणीसाव्यापासून बावीसाव्या श्लोकापर्यंत "उग्र" रूपाचे आणि तेवीसाव्यापासून तीसाव्या श्लोकापर्यंत "अत्यंत उग्र" रूपाचे वर्णन आले आहे.]

**बहुवक्त्रनेत्रम्**—आपले मुख एकमेकाशी जुळत नाहीत. कित्येक सौम्य आहेत आणि कित्येक विकराळ आहेत. कित्येक मुख लहान आहेत आणि कित्येक मोठे आहेत. तसेच आपले जे डोळे आहेत तेही एकासारखे एक दिसत नाहीत. कित्येक डोळे सौम्य आहेत आणि कित्येक विकराळ आहेत. कित्येक डोळे लहान आहेत, कित्येक मोठे आहेत, कित्येक लांबट आहेत, कित्येक पसरट आहेत, कित्येक गोल आहेत, कित्येक वेडेवाकडे आहेत इत्यादी इत्यादी.

* येथे आलेल्या "असुर" शब्दात "नञ्" समास आहे-"न सुरा असुराः" म्हणून येथे असुर शब्द देवतांच्या विरोधाचा वाचक आहे.

**बहुबाहूरुपादम्**—हातांची बनावट, वर्ण, आकृती आणि त्यांचे कार्य विलक्षण, विलक्षण आहेत. जंघा विचित्र विचित्र आहेत आणि पायही अनेक प्रकारचे आहेत.

**बहूदरम्**—पोट देखील एकसारखे नाहीत, कोणते मोठे, कोणते लहान, कोणते भयंकर इत्यादी कित्येक प्रकारची पोटे आहेत.

**बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम्**—मुखात अनेक प्रकारच्या विकराळ दाढा आहेत. अशा महान् भयंकर, विकराळरूपाला पाहून सर्व प्राणी व्याकूळ होत आहेत आणि मीही व्याकूळ होत आहे.

या श्लोकाच्या पूर्वी आलेल्या श्लोकातही अनेक मुखे, डोळे इत्यादींचा आणि सर्व लोक भयभीत होत असल्याचा विषय आलेला आहे. म्हणून अर्जुन एकच गोष्ट वारंवार का सांगत आहेत ? याचे कारण—

(१) विराटरूपात अर्जुनासमोर जे जे दृश्य येत आहे, त्यात त्यांना नवीनवी विलक्षणता आणि दिव्यता दिसत आहे.

(२) विराटरूपाला पाहून अर्जुन इतके घाबरले, चकित झाले, चक्रावून गेले, व्यथित झाले की, त्यांना भानच राहिले नाही, की मी काय बोलतो आणि काय बोलत आहे?

(३) पूर्वी तर अर्जुनांनी त्रैलोक्य व्यथित होण्याविषयी म्हटले होते, परंतु या ठिकाणी सर्व प्राण्यांसह स्वतःही व्यथित होत असल्याचे म्हणत आहेत.

(४) एकच विषय पुन्हा पुन्हा सांगणे अर्जुनाचे भयभीत झाल्याचे आणि आश्चर्यचकित होण्याचे चिन्ह आहे. संसारात असे पाहण्यात येते की, ज्याला भय, हर्ष, शोक, आश्चर्य इत्यादी विकार होत असतात. त्याच्या मुखातून स्वाभाविकच एखाद्या शब्दाचा अथवा वाक्याचा वारंवार उच्चार होत असतो. जसे एखादा सापाला पाहून भयभीत होत असतो. त्यावेळी तो वारंवार "साप, साप, साप" असे म्हणत असतो. कोणी एखादा सज्जन पुरुष आपल्याकडे आला तर आनंदाच्या भरात "या, या, या" असे स्वागत करताना म्हणतो. कोणी प्रिय व्यक्ती मृत झाल्यास शोकाकुल होऊन म्हणतो "वाईट झाले, मी निराधार झालो, मी मारला गेलो, घरातला प्रकाश गेल्याने अंधार पडला" वगैरे. अचानक एखादे भयंकर संकट आले तर तो ओरडतो "मी मेलो, मी मेलो, मी मेलो". त्याचप्रमाणे येथे विश्वरूप दर्शनात भय आणि हर्षामुळे अर्जुनाकडून काही शब्द आणि वाक्य पुन्हा पुन्हा उच्चारले जात आहेत. अर्जुनाने भय आणि हर्षाचा स्वीकारही केला आहे "**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे**" (११।४५) तात्पर्य; भय, हर्ष, शोक इत्यादीत एका विषयाचे वारंवार उच्चार करणे हा पुनरुक्ती दोष मानला जात नाही.

**परिशिष्ट भाव**—दिसणारे आणि पाहणारे, व्यथित करणारे आणि व्यथित होणारे सर्व प्राणी आणि स्वतः अर्जुन सुद्धा भगवंताच्या विराटरूपाच्या अंतर्गतच आहेत.

## नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्।
## दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो॥ २४॥

**हि** = कारण
**विष्णो** = हे विष्णो! (आपले)
**दीप्तम्** = दैदीप्यमान
**अनेकवर्णम्** = अनेक वर्ण आहेत,
**नभःस्पृशम्** = आपण आकाशाला स्पर्श करीत आहात अर्थात् चहू बाजूंनी फार मोठे आहात,
**व्यात्ताननम्** = आपले मुख पसरलेले आहे,
**दीप्तविशालनेत्रम्** = आपले नेत्र प्रदीप्त आणि विशाल आहेत.
**त्वाम्** = (अशा) आपणाला
**दृष्ट्वा** = पाहून
**प्रव्यथितान्तरात्मा** = भयभीत अंतःकरणाचा (मी)
**धृतिम्** = धैर्य
**च** = आणि
**शमम्** = शांतीला
**न, विन्दामि** = प्राप्त होत नाही.

*व्याख्या*— [वीसाव्या श्लोकात तर अर्जुनाने विराट-रूपाच्या लांबी रुंदीचे वर्णन केले आहे. आता येथे केवळ लांबीचे वर्णन करत आहेत.]

**विष्णो**—आपण साक्षात् सर्वव्यापक विष्णू आहात, ज्यांनी पृथ्वीचा भार दूर करण्यासाठी कृष्णरूपाने अवतार घेतला आहे.

**दीप्तमनेक वर्णम्**—आपले काळे, पिवळे, शाम, गौर इत्यादी अनेक वर्ण आहेत, जे फारच दैदिप्यमान् आहेत.

**नभःस्पृशम्**—आपले स्वरूप इतके उंच आहे की, ते आकाशाला स्पर्श करत आहे. स्पर्श हा वायूचा गुण असल्याने वायूचाच स्पर्श होत असतो, आकाशाचा नव्हे. मग इथे आकाशाला स्पर्श करण्याचे तात्पर्य काय आहे? मनुष्याची दृष्टी

जेथपर्यंत जाते तेथपर्यंत तर त्याला आकाशच दिसते, पण त्यापुढे निळेपणा दिसून येतो. कारण जेव्हा दृष्टी पुढे जात नाही, थकून जाते तेव्हा ती तेथून परतते, ज्यामुळे पुढे निळेपणा दिसतो. हेच दृष्टीचे आकाशाला स्पर्श करणे आहे. त्याचप्रमाणे अर्जुनाची दृष्टी जेथपर्यंत जाते, तेथपर्यंत त्यांना भगवंताचे विराटरूप दिसत आहे. याचे तात्पर्य भगवंताचे विराटरूप इतके असीम आहे की, त्यापुढे दिव्य दृष्टी देखील सीमितच ठरत आहे.

**व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्**—जसे एखादा क्रूर प्राणी दुसऱ्या प्राण्याला खाऊन टाकण्यासाठी आपले मुख पसरतो तसेच संपूर्ण विश्व खाऊन टाकण्यासाठी आपले मुख पसरलेले दिसत आहे.

आपले डोळे फारच दैदिप्यमान् आणि विशाल दिसत आहेत.

**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो**—अशा प्रकारे आपल्याला पाहून मी आतून फारच व्यथित होत आहे. मला कोठूनही धैर्य मिळत नाही आणि शांतीही मिळत नाही.

येथे एक शंका उपस्थित होते की, अर्जुनाचे ठिकाणी एक तर स्वत:चे सामर्थ्य आहे आणि दुसरे भगवत्प्रदत्त सामर्थ्य (दिव्यदृष्टी) आहे तरीही अर्जुन विश्वरूपाला पाहून भ्याले परंतु संजय भ्याले नाहीत. याचे काय कारण आहे? संतांकडून असे ऐकले आहे की, भीष्म, विदुर, संजय आणि कुन्ती हे चारीही भगवान् श्रीकृष्णाच्या तत्त्वाला विशेषत्वाने जाणणारे होते. म्हणून संजय पूर्वीपासूनच भगवंताच्या तत्त्वाला, त्यांच्या प्रभावाला जाणत होते. परंतु अर्जुन भगवंताच्या तत्त्वाला तितके जाणत नव्हते. अर्जुनाचा विमूढभाव (मोह) अजून संपूर्णपणे समाप्त झाला नव्हता. (११।४९) या विमूढभावामुळे अर्जुन भयभीत झाले. परंतु संजय भगवंताच्या तत्त्वाला जाणत होते, अर्थात् त्यांचे ठिकाणी विमूढभाव नव्हता, म्हणून ते भयभीत झाले नाहीत.

उपर्युक्त विवेचनाने एक गोष्ट सिद्ध होते की, भगवान् आणि महापुरुषांची कृपा विशेषत्वाने अयोग्य मनुष्यावर होत असते, परंतु त्या कृपेला योग्य मनुष्यच विशेषत्वाने जाणत असतो. जसे लहान बालकावर आईची विशेष प्रीती असते; परंतु मोठा मुलगा आईला जितका जाणत असतो, तितका लहान बालक जाणत नाही. तसेच भोळे-भाळे, साधे-सुधे व्रजवासी, गोपाळ, गोप-गोपी आणि गाय यांच्यावर भगवान् जितका अधिक स्नेह करतात, तितका स्नेह जीवन्मुक्त महापुरुषांवर करत नाहीत. परंतु जीवन्मुक्त महापुरुष गोपाळ इत्यादीपेक्षा भगवंताला विशेषरूपाने जाणतात. संजयाने विश्वरूपासाठी प्रार्थनाही केली नाही आणि विश्वरूप पाहिले. परंतु विश्वरूप पाहण्यासाठी अर्जुनाला स्वत: भगवंतानीच उत्कंठित केले आणि आपले विश्वरूपही दाखविले. कारण संजयापेक्षा भगवंताच्या तत्त्वाला जाणण्यात अर्जुन बाल होते आणि भगवंताशी सखाभाव ठेवत होते. म्हणून अर्जुनावर भगवंताची कृपा अधिक होती. या कृपेमुळेच शेवटी अर्जुनाचा मोह नष्ट झाला- **"नष्टो मोह:.....त्वत्प्रसादात्"** (१८।७३) यावरुन सिद्ध होते की, कृपापात्राचा मोह शेवटी नष्ट होतच असतो.

**परिशिष्ट भाव**—येथे आलेले **'नभ:स्पृशम्'** पद विराटरूपाच्या अनंततेचे द्योतक आहे. अर्जुनाची दृष्टी जेथपर्यंत जाते तेथपर्यंत त्यांना विराटरूपच दिसत आहे—**'सा काष्ठा सा परा गति:'** (कठ० १।३।११) अर्थात् तो परमात्मा सर्वांची परम-अवधी आणि परमगती आहे.

## दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि।
## दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास॥ २५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ते** | = आपल्या | **मुखानि** | = मुखांना | **लभे** | = मिळत |
| **कालानल-** | = प्रलयकाळीन | **दृष्ट्वा** | = पाहून (मला) | **न** | = नाही (म्हणून) |
| **सन्निभानि** | अग्नीसारख्या प्रज्वलित | **दिश:** | = दिशांचे | **देवेश** | = हे देवेश! |
| **च** | = आणि | **जाने, न** | = ज्ञानही होत नाही | **जगन्निवास** | = हे जगन्निवास! |
| **दंष्ट्राकरालानि** | = दाढांमुळे विकराळ (भयंकर) | **च** | = आणि | **प्रसीद** | = (आपण) प्रसन्न व्हा. |
| | | **शर्म, एव** | = शांतीही | | |

*व्याख्या*—**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि**—महाप्रलय काळी संपूर्ण त्रैलोक्याला भस्म करणारा जो अग्नी प्रगट होत असतो, त्याला संवर्तक अथवा कालाग्नी म्हणतात. त्या कालाग्नीप्रमाणे आपली मुखे आहेत, जी भयंकर विकराळ असलेल्या दाढामुळे फारच भयानक दिसत आहेत. त्यांना पाहताच फार मोठी भीती उत्पन्न

होत आहे. त्यांचे कार्य पाहिले तर त्यांच्यासमोर कोणाचाही टिकाव लागणे कठीण आहे.

**दिशो न जाने न लभे च शर्म**—अशा विकराळ मुखांना पाहून मला दिशांचेही भान होत नाही. याचे तात्पर्य, सूर्याच्या उदय आणि अस्ताने दिशांचे ज्ञान होत असते; परंतु तो सूर्य तर आपल्या डोळ्याच्या जागी आहे अर्थात् तो विराटरूपाच्या अंतर्गत आला आहे. याशिवाय आपल्या चारीही बाजूंनी महान् प्रज्वलित प्रकाशच प्रकाश दिसत आहे. (११।१२) ज्याचा उदयही होत नाही आणि अस्तही होत नाही. म्हणून मला दिशांचे ज्ञान होत नाही आणि विक्राळ मुखांना पाहून भयाने मला कोणतेही सुख आणि शांती मिळत नाही.

**प्रसीद देवेश जगन्निवास**—आपण सर्व देवतांचे स्वामी आहात आणि संपूर्ण संसार आपल्यातच निवास करत आहे. म्हणून कोणतीही देवता, मनुष्य भयभीत झाल्यावर आपलाच तर धावा करील. आपल्याशिवाय दुसऱ्या कोणाचा धावा करील? तसेच दुसरा कोण ऐकेल? म्हणून मीही आपल्याला कळकळीने प्रार्थना करत आहे की, हे देवेश ! हे जगन्निवास ! आपण प्रसन्न व्हा.

भगवंताच्या विक्राळ रूपाला पाहून अर्जुनाला असे वाटले की, भगवान् जणू फार रागावलेले आहेत. या भावनेनेच भयभीत झालेले अर्जुन भगवंतांनी प्रसन्न व्हावे म्हणून प्रार्थना करत आहेत.

**परिशिष्ट भाव**—भगवान् तर प्रसन्न होऊनच अर्जुनाला आपले विराटरूप दाखवित आहेत (गीता ११।४७), परंतु त्यांच्या रूपाच्या उग्रतेला पाहून अर्जुनाला हा भ्रम होत आहे की, भगवान् अप्रसन्न आहेत. म्हणून ते भगवंताला प्रसन्न होण्यासाठी प्रार्थना करीत आहेत.

*संबंध—आता अर्जुन पुढील दोन श्लोकांत मुख्य मुख्य योद्धे विराटरूपात प्रवेश करत असल्याचे वर्णन करत आहेत.*

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः॥ २६॥**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु सन्दृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः॥ २७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अस्मदीयैः** | = आमच्या पक्षाच्या | **अवनिपालसङ्घैः**, | = राजांच्या | **वक्त्राणि** | = मुखांमध्ये |
| **योधमुख्यैः, सह** | = मुख्य मुख्य योद्ध्यांसह | **सह** | समुदायांसह | **त्वरमाणाः** | = मोठ्या वेगाने |
| **भीष्मः** | = भीष्म, | **धृतराष्ट्रस्य** | = धृतराष्ट्राचे | **विशन्ति** | = प्रविष्ट होत आहेत. |
| **द्रोणः** | = द्रोणाचार्य | **अमी, एव** | = तेच | **केचित्** | = (त्यापैकी) कित्येक तर (त्यांच्या) |
| **तथा** | = आणि | **सर्वे** | = सर्वचे सर्व | **चूर्णितैः** | = चूर्ण झालेल्या |
| **असौ** | = तो | **पुत्राः** | = पुत्र | **उत्तमाङ्गैः** | = मस्तकांसह |
| **सूतपुत्रः, अपि** | = कर्णही | **ते** | = आपल्या | **दशनान्तरेषु** | = (आपल्या) दातांमध्ये |
| **त्वाम्** | = आपल्यात | **दंष्ट्राकरालानि** | = विकराल दाढां असलेल्या | **विलग्नाः** | = फसलेले |
| **विशन्ति** | = प्रविष्ट होत आहेत. | **भयानकानि** | = भयंकर | **सन्दृश्यन्ते** | = दिसत आहेत. |

*व्याख्या*—**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः**—माझ्या पक्षाचे धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद इत्यादी जे मुख्य मुख्य योद्धे आहेत. ते सर्व धर्माच्या पक्षात आहेत आणि केवळ आपले कर्तव्य समजून युद्धासाठी आले आहेत. माझ्या ह्या सेनापतींबरोबर पितामह भीष्म, आचार्य द्रोण आणि तो प्रसिद्ध सूतपुत्र कर्ण आपल्यात प्रविष्ट होत आहेत.

या ठिकाणी भीष्म, द्रोण आणि कर्णाचे नाव घेण्याचे तात्पर्य, हे तिन्हीही आपल्या कर्तव्याचे पालन करण्यासाठी युद्धात आले होते.*

* **भीष्म**—भीष्माचार्यांची प्रतिज्ञा जगात प्रसिद्ध आहे की, त्यांनी पित्याच्या प्रसन्नतेसाठी विवाह न करण्याची प्रतिज्ञा केली होती आणि बाल-ब्रह्मचारी राहिले. या प्रतिज्ञेवर इतके अढळ राहिले की, त्यांनी गुरू परशुरामाबरोबर युद्ध केले, परंतु आपली प्रतिज्ञा भंग होऊ दिली नाही. भगवंतांनी हातात शस्त्र धरणार नाही, अशी प्रतिज्ञा केली होती; परंतु जेव्हा भीष्माचार्यांनी (भगवंताच्या प्रतिज्ञेविरुद्ध) अशी प्रतिज्ञा केली की "आजु जो हरिहिं

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः**—दुर्योधनाच्या पक्षात जितके राजेलोक आहेत जे युद्धात दुर्योधनाचे प्रिय करू इच्छितात (१।२३) अर्थात् दुर्योधनाला हिताचा सल्ला देत नाहीत. त्या सर्व राजांसह धृतराष्ट्राचे दुर्योधन, दु:शासन इत्यादी शंभर पुत्र विक्राळ दाढा असलेल्या अत्यंत भयानक आपल्या मुखात मोठ्या वेगाने प्रवेश करत आहेत-''**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि**''

विराटरूपात ते मग भगवंतात प्रवेश करोत अथवा भगवंताच्या मुखात जावोत, त्या दोन्ही एकच लीला आहेत. परंतु भावानुसार त्यांच्या गती वेगवेगळ्या प्रतीत होत आहेत. म्हणून भगवंतात जावोत की मुखात जावोत—ते तर विराटरूपातच आहेत.

**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु सन्दृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः**—जसे खाद्य पदार्थात काही पदार्थ असे असतात की, जे चावल्यानंतर सरळ पोटात जातात परंतु काही पदार्थ असे असतात, जे चावताना दातात आणि दाढेत अडकून बसतात. त्याचप्रमाणे आपल्या मुखात प्रविष्ट होणारांपैकी कित्येक तर सरळ आत (पोटात) जात आहेत, परंतु काही त्यांच्या चूर्ण झालेल्या मस्तकांसह आपल्या दातात आणि दाढात अडकून पडलेले दिसत आहेत.

या ठिकाणी एक शंका येते की, योद्धेलोक तर अजून समोर युद्धक्षेत्रात उभे आहेत; मग ते अर्जुनाला विराटरूपाच्या मुखात जात असलेले कसे दिसले ? याचे समाधान असे आहे की, भगवान् विराटरूपात अर्जुनाला पुढे घडणाऱ्या गोष्टी दाखवित आहेत. भगवंतांनी विराटरूप दाखवताना अर्जुनाला म्हटले होते की, तू आणखी काही पाहू इच्छित असशील, तेही माझ्या ह्या विराटरूपात पाहून घे (११।७). अर्जुनाच्या मनात शंका होती की, युद्धात आपला विजय होईल का कौरवांचा? (२।६) म्हणून ती शंका दूर करण्यासाठी भगवान् अर्जुनाला लगेच भविष्यात होणारे दृष्य दाखवून जणू हे सांगत आहेत की, युद्धात तुझाच विजय होईल. पुढे अर्जुनाने प्रश्न केल्यावरही भगवंतांनी हीच गोष्ट सांगितली आहे (११।३२-३४).

**परिशिष्ट भाव**—अर्जुन भगवंताच्या विराटरूपात लवकर प्राप्त होणाऱ्या भविष्याला पाहत आहेत. काळातीत असल्यामुळे भगवंतात भूत, भविष्य आणि वर्तमान—तिन्ही काळ वर्तमानच आहेत (गीता ७। २६).

*संबंध—जे आपले कर्तव्य समजून धर्माला अनुसरून युद्धात आले आहेत आणि परमात्मप्राप्तीचे इच्छुक आहेत, नदीच्या दृष्टांताने अशा पुरुषांच्या विराटरूपात प्रवेश करण्याचे वर्णन अर्जुन पुढील श्लोकात करत आहेत.*

## यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति।
## तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति॥ २८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यथा** | = जसे | **अम्बुवेगाः** | = जलप्रवाह | **अभिमुखाः** | = सन्मुख |
| **नदीनाम्** | = नद्यांचे | **एव** | = (स्वाभाविक) च | **द्रवन्ति** | = धावतात, |
| **बहवः** | = पुष्कळसे | **समुद्रम्** | = समुद्राच्या | **तथा** | = तसेच |

न शस्त्र गहाऊं/तौ लाजौ गंगा जननीको शान्तनु-सुत न कहाऊं॥'' त्यावेळी भगवंतालाही आपली प्रतिज्ञा भंग करून एक वेळ चाबुक आणि दुसऱ्या वेळी चक्र घेऊन भीष्माचार्यांकडे धावावे लागले. अशा प्रकारे भीष्माचार्यांची प्रतिज्ञा कायम राहिली आणि भगवंताची प्रतिज्ञा भंग झाली.

**द्रोणाचार्य**—द्रोणाचार्य, दुर्योधनाचे अन्न खाऊन त्याचे वृत्तिभोगी बनले होते. म्हणून ते युद्धाला आपले कर्तव्य समजून युद्धात प्रवृत्त झाले होते आणि शेवटी देवतांची वचने ऐकून आणि युद्ध हे ब्राह्मणोचित धर्म नव्हे, असे समजून युद्धापासून परावृत्त झाले.

द्रोणाचार्यांचे ठिकाणी मुळीच पक्षपात नव्हता. त्यांची ख्याती अशी आहे की, गुरुभक्त आणि विद्येत तत्पर असणाऱ्या अर्जुनाला त्यांनी ब्रह्मास्त्र सोडणे आणि त्याचा उपसंहार करणे (परत घेणे) ह्या दोन विद्या शिकविल्या होत्या, परंतु आपला मुलगा अश्वत्थामा याला मात्र केवळ ब्रह्मास्त्र सोडणेच शिकविले होते; उपसंहार करणे शिकविलेच नाही.

**कर्ण**—कर्णाची दुर्योधनाबरोबर मित्रता होती. त्या मित्रत्वाच्या नात्याने ते युद्धात आले होते. भगवान् श्री कृष्णानी ''तू कुंतीचा मुलगा आहेस'' असे सांगितले तरीही, त्यांनी दुर्योधनाचा पक्ष सोडला नाही आणि त्यांनी भगवंताना उत्तर दिले की, ''ही गोष्ट आपण धर्मराजाला (युधिष्ठिर) सांगू नका, कारण जर त्यांना हे कळले तर ते मला मोठा भाऊ समजून राज्य देऊन टाकतील आणि मी ते राज्य दुर्योधनाला देईन. यामुळे पांडव नेहमीसाठी दु:खी होतील.''

कर्ण फारच दृढ प्रतिज्ञ होते. ते विचित्रच दानवीर होते. इंद्राच्या मागणीवर त्यांनी आपले नैसर्गिक (जन्मजात) कुंडल आणि कवच काढून दिले होते. माता कुंतीच्या मागणीप्रमाणे त्यांनी पाच पुत्र कायम राहतील, असे वचन दिले होते. ते आईला म्हणाले, ''मी युधिष्ठिर, भीम, नकुल आणि सहदेव यांना तर मारणार नाही परंतु अर्जुनाबरोबर माझे युद्ध होईल. युद्धात जर अर्जुनाने मला मारले तर, तुझे पाच पुत्र राहतीलच आणि जर मी अर्जुनाला मारले, तरीही माझ्यासह तुझे पाच पुत्र राहतील.''

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अमी** | = ते | **तव** | = आपल्या | **वक्त्राणि** | = मुखांमध्ये |
| **नरलोकवीराः** | = संसारातील महान शूरवीर | **अभिविज्वलन्ति** | = चहूकडून प्रज्वलित असलेल्या | **विशन्ति** | = प्रवेश करीत आहेत. |

*व्याख्या*— **यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति**—मूळात संपूर्ण पाणी समुद्राचेच आहे. तेच पाणी ढगाद्वारा पावसाच्या रूपाने पृथ्वीवर वर्षाव होऊन झरे, ओढे इत्यादीना घेऊन नदीचे रूप धारण करत असते. त्या नद्यांचे जितके प्रवाह, वेग आहेत ते सर्व स्वाभाविकच समुद्राकडे धावत असतात, कारण पाण्याचे उद्गम स्थान समुद्रच आहे. ते सर्व जलप्रवाह समुद्रामध्ये जाऊन आपल्या नावा रूपाचा त्याग करून अर्थात् गंगा, यमुना, सरस्वती इत्यादी नावांचा आणि प्रवाहाच्या रूपाचा त्याग करून, समुद्ररूपच बनतात. मग ते जलप्रवाह समुद्राशिवाय आपले कोणते वेगळे स्वतंत्र अस्तित्व ठेवत नाहीत. वास्तविक पाहिले तर, त्यांचे स्वतंत्र अस्तित्व पूर्वीही नव्हते, केवळ नदीच्या प्रवाहरूपात असल्याकारणाने ते वेगळे दिसत होते.

**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति**—नदीप्रमाणेच संपूर्ण जीव नित्य सुखाच्या अभिलाषेने परमात्म्याच्या सन्मुखच धावत असतात. परंतु अज्ञानाने असत्, नाशवान, शरीराशी संबंध कायम ठेवून ते सांसारिक संग्रह आणि संयोगजन्य सुखाकडे वळतात आणि आपले वेगळे अस्तित्व मानू लागतात. त्या जीवात तेच वास्तविक शूरवीर आहेत, जे सांसारिक संग्रह आणि सुखभोगात न फसता, ज्याच्यासाठी शरीर मिळाले आहे त्या परमात्मप्राप्तीच्याच मार्गात तत्परतेने अग्रेसर झाले आहेत. अशा युद्धात आलेले भीष्माचार्य, द्रोणाचार्य इत्यादी शूरवीर आपल्या प्रकाशमय (ज्ञानस्वरूप) मुखात प्रविष्ट होत आहेत.

समोर दिसणाऱ्या लोकामध्ये परमात्मप्राप्तीचे इच्छुक लोक विलक्षण आहेत आणि फार थोडे आहेत. म्हणून त्यांच्यासाठी परोक्षवाचक **"अमी"** (ते) पद दिले गेले आहे.

*संबंध—जे राज्य आणि प्रशंसा यांच्या लोभाने युद्धात आले आहेत आणि जे सांसारिक संग्रह आणि भोगांच्या मागे लागले आहेत अशा पुरुषांचे विराटरूपात प्रवेश करण्याचे वर्णन पतंगाच्या दृष्टांताने अर्जुन पुढील श्लोकात करत आहेत.*

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥ २९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यथा** | = ज्याप्रमाणे | **प्रदीप्तम्** | = प्रज्वलित | **नाशाय** | = (स्वतःचा) नाश करून घेण्यासाठी |
| **पतङ्गाः** | = पतंग (मोहवश) | **ज्वलनम्** | = अग्नीमध्ये | | |
| **नाशाय** | = (स्वतःचा) नाशकरून घेण्यासाठी | **विशन्ति** | = प्रविष्ट होतात | **समृद्धवेगाः** | = मोठ्या वेगाने धावत |
| | | **तथा, एव** | = त्याचप्रमाणे | **तव** | = आपल्या |
| **समृद्धवेगाः** | = मोठ्या वेगाने धावत जाऊन | **लोकाः, अपि** | = हे सर्वलोकही (मोहवश) | **वक्त्राणि** | = मुखात |
| | | | | **विशन्ति** | = प्रविष्ट होत आहेत. |

*व्याख्या*— **यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः**—ज्याप्रमाणे हिरव्या गवतात राहणारे पतंग, चातुर्मासाच्या अंधाऱ्या रात्रीत, कुठे जर प्रज्वलित अग्नी दिसला तर त्यावर मुग्ध होऊन (की फारच सुंदर प्रकाश मिळाला, आपण याचा फार लाभ घेऊ, आपला अंधार नाहीसा होईल) त्याकडे मोठ्या वेगाने धावतात. त्यापैकी काही तर अग्नीत स्वाहा होतात, काहीना अग्नीचा चटका लागल्याने त्यांचे उडणे बंद होत असते आणि तडफडत राहतात. असे असतानाही त्यांची ओढ अग्नीकडेच असते. जर कोणी एखाद्याने दयेने त्या अग्नीला विझवून टाकले तर आपल्याला मोठ्या लाभापासून वंचित केले म्हणून ते पतंग फार दुःखी होतात.

**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः**—भोग भोगणे आणि संग्रह करण्यातच तत्परतेने मग्न राहणे आणि मनात भोग आणि संग्रहाचे चिंतन होत राहणे—हाच वाढलेला सांसारिक वेग आहे. असा वेग असलेले दुर्योधनादी राजेलोक पतंगासारखे मोठ्या वेगाने कालचक्ररूपी आपल्या मुखात जात आहेत अर्थात् पतनाकडे, चौऱ्यांशी लाख योनीकडे, नरकाकडे जात आहेत. तात्पर्य, बहुतेक मनुष्य सांसारिक भोग, सुख, आराम, मान, आदर, इत्यादी प्राप्त करण्यासाठी रात्रंदिवस धावत राहतात. ते मिळविण्यात त्यांचा अपमान होत असतो, निंदा होत असते, नुकसान होत

असते, चिंता लागते, अंतः करण सारखे जळत राहते आणि ज्या आयुष्याच्या बळावर जिवंत राहतात ते आयुष्यही समाप्त होते, तरीही ते नाशवान् भोग आणि संग्रहाच्या प्राप्तीसाठी मनातून आतुर राहतात.*

**परिशिष्ट भाव**—मागील श्लोकात नद्यांचा आणि या श्लोकांत पंखाड्यांचा दृष्टांत दिला गेला आहे. पंखाडे तर मोहाला बळी पडून घेण्याच्या (स्वार्थाच्या) इच्छेने स्वतःअग्नीत उडी घेतात परंतु नद्या आपण-आपल्याला देण्यासाठी समुद्राकडे धावतात. म्हणून जो मनुष्य 'घेण्याची' इच्छा बाळगतात ते पंखाड्यासारखे आहेत आणि जे मनुष्य 'देण्याची' इच्छा ठेवतात ते नद्यासारखे आहेत. घेण्याचा भाव 'जडता' आहे. आणि देण्याचा भाव चेतनता आहे. घेण्याच्या भावनेने अशुभ कर्म आणि देण्याच्या भावनेने शुभकर्म होतात. घेण्याच्या इच्छुकासाठी स्वर्ग आहे आणि देण्याच्या इच्छुकासाठी मोक्ष आहे. कारण घेण्याचा भाव बांधणारा आणि देण्याचा भाव मुक्त करणारा असतो.

***संबंध**—मागील दोन श्लोकांत दोन दृष्टांतांनी दोन समुदायाचे वर्णन करून आता संपूर्ण लोकांना खाऊन टाकीत असलेल्या विश्वरूपी भगवंताच्या भयानक रूपाचे वर्णन करत आहेत.*

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो॥ ३०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ज्वलद्भिः** | = (आपण आपल्या) प्रज्वलित | **समन्तात्** | = सर्व बाजूंनी | **समग्रम्** | = संपूर्ण |
| **वदनैः** | = मुखांद्वारा | **लेलिह्यसे** | = वारंवार चाटत आहात, | **जगत्** | = जगताला |
| **समग्रान्** | = संपूर्ण | **विष्णो** | = (आणि) हे विष्णो! | **तेजोभिः** | = आपल्या तेजाने |
| **लोकान्** | = लोकांना | **तव** | = आपला | **आपूर्य** | = परिपूर्ण करून |
| **ग्रसमानः** | = गिळून टाकीत (त्यांना) | **उग्राः** | = उग्र | **प्रतपन्ति** | = (सर्वांना) तप्त करीत आहे. |
| | | **भासः** | = प्रकाश | | |

*व्याख्या*—**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः**—आपण संपूर्ण प्राण्यांचा संहार करत आहात आणि कोणी इकडे तिकडे सुटून जाऊ नये, म्हणून वारंवार जिभेच्या फटक्याने आपल्या प्रज्वलित मुखात घेऊन, त्यांना गिळून टाकत आहात. तात्पर्य, काळरूपी भगवंताच्या जीभेच्या फटकाऱ्यात कोणीच वाचू शकत नाही.

**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो**—विराट भगवंताचे तेज फारच उग्र आहे. ते उग्र तेज संपूर्ण जगताला परिपूर्ण प्रकाशित करून सर्वांना संतप्त करत आहे, व्यथित करत आहे.

**परिशिष्ट भाव**—येथे '**लोकान्समग्रान्**' (सर्वलोक) आणि '**जगत्समग्रम्**' (जड-चेतन, स्थावर-जंगमरूपी संपूर्ण जगत्) म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, हे सर्व काही भगवंताच्याच समग्ररूपाच्या अंतर्गत आहे.

गीतेत भगवंतालाही समग्र म्हटले आहे—'**असंशयं समग्रं माम्**' (७।१), कर्मांनाही समग्र म्हटले आहे—'**यज्ञायाचरतः कर्म समग्रम्**' (४।२३) आणि संसारालाही समग्र म्हटले आहे (११।३०). याचे तात्पर्य, सर्व भगवंताचीच रूपे आहेत.

***संबंध**—विराटरूपी भगवान् आपल्या विलक्षण-विलक्षण रूपाचे दर्शन करवितच चालले आहेत. त्यांचे भयंकर आणि अत्यंत उग्ररूपाच्या मुखात संपूर्ण प्राणी आणि दोन्ही पक्षाचे योद्धे जात असलेले पाहून अर्जुन फारच घाबरून गेले. म्हणून अत्यंत उग्ररूपधारी भगवंताचा वास्तविक परिचय करून घेण्यासाठी अर्जुन प्रश्न करत आहेत.*

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्॥ ३१॥**

---

* अजानन् दाहात्म्यं पतति शलभो दीपदहने स मीनोऽप्यज्ञानाद्बडिशयुतमश्नाति पिशितम्। विजानन्तोऽप्येते वयमिह विपज्जालजटिलान् न मुञ्चामः कामानहह गहनो मोहमहिमा॥ (भर्तृहरिवैराग्यशतक) ''पतंग दीपकाच्या दाहक स्वरूपाला न जाणल्यामुळेच त्यावर झडप घालतो, मासाही अज्ञानामुळेच गळाला लागलेल्या मांसाला गिळत असतो. परंतु आम्ही लोक जाणत असतानाही विपत्तीच्या जाळ्यात फसविणाऱ्या कामनांना सोडत नाही. अहो! मोहाचा महिमा किती गहन आहे!''

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मे** | = मला हे | **ते** | = आपणाला | | जाणू |
| **आख्याहि** | = सांगा की, | **नमः** | = नमस्कार | **इच्छामि** | = इच्छितो, |
| **उग्ररूपः** | = उग्ररूपधारी | **अस्तु** | = असो. | **हि** | = कारण (मी) |
| **भवान्** | = आपण | **प्रसीद** | = (आपण) प्रसन्न व्हा. | **तव** | = आपल्या |
| **कः** | = आहात तरी कोण? | **आद्यम्** | = आदिरूप | **प्रवृत्तिम्** | = प्रवृत्तीला |
| | | **भवन्तम्** | = आपणाला (मी) | **न प्रजानामि** | = चांगल्या प्रकारे जाणत नाही |
| **देववर** | = हे देवतांमध्ये श्रेष्ठ! | **विज्ञातुम्** | = तत्त्वाने | | |

*व्याख्या*— **आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद**—आपण देवरूपानेही दिसत आहात आणि उग्ररूपानेही दिसत आहात. तर वास्तविक असे रूप धारण करणारे आपण कोण आहात?

अत्यंत उग्र विराटरूपाला पाहून अर्जुन नमस्काराशिवाय आणखी काय करू शकत होते? जेव्हा अर्जुन भगवंताच्या अशा विराटरूपाला समजून घेण्यात असमर्थ ठरले, तेव्हा शेवटी म्हणतात की, हे देवश्रेष्ठ! आपणास नमस्कार असो.

भगवान् आपल्या जीभेने सर्वांना आपल्या मुखात घेऊन वारंवार चाटत आहेत. अशा भयंकर वर्तनाला पाहून अर्जुन आपण प्रसन्न व्हा म्हणून प्रार्थना करतात.

**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्**—भगवंताचा प्रथम अवतार विराटरूपातच (संसार) झाला होता. म्हणून अर्जुन म्हणतात की, आदि नारायणा!, आपणाला मी स्पष्टपणे तत्त्वतः जाणत नाही. आपण येथे कशासाठी प्रगट झालात? ह्या प्रवृत्तीलाही मी जाणत नाही. आपल्या मुखात माझ्या पक्षाचे तसेच विपक्षाचे पुष्कळसे योद्धे प्रविष्ट होत आहेत, म्हणून आपण वास्तविक काय करू इच्छित आहात? तात्पर्य, आपण कोण आहात आणि काय करू इच्छित आहात—ही गोष्ट मी जाणून घेऊ इच्छितो आणि आपण ते स्पष्टपणे सांगा.

प्रश्न असा होतो की, भगवंताचा प्रथम अवतार विराट-रूपात (संसार) झाला आणि आता अर्जुन भगवंताच्या शरीराच्या कोण्या एका देशात विराटरूप पाहत आहेत ही दोन्ही विराटरूपे एकच आहेत का वेगवेगळी ? याचे उत्तर असे की, वास्तविक गोष्ट तर भगवंतालाच माहीत असणार पण विचार केला असता असे वाटते की, अर्जुनाने जे विराटरूप पाहिले होते, त्याच्याच अंतर्गत हे संसाररूपी विराटरूपही होते. जसे, म्हटले जाते की, भगवान् सर्वव्यापी आहेत तर याचे तात्पर्य, केवळ इतकेच नव्हे की, भगवान् केवळ संपूर्ण संसारातच व्यापून आहेत, तर भगवान् संसाराच्या बाहेरही व्यापून आहेत. संसार तर भगवंताच्या कोण्या एका अंशात असतो. अशा अनंत सृष्टी भगवंताच्या कोण्या एका अंशात आहेत. त्याचप्रमाणे अर्जुन ज्या विराटरूपाला पाहत आहेत त्यात हा संसारही आहे आणि याशिवाय आणखी काही पुष्कळच आहे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या ऐश्वर्ययुक्त उग्ररूपाला पाहून अर्जुन घाबरतात आणि आपल्याच सख्याला-श्रीकृष्णाला विचारतात की, आपण कोण आहात!

*संबंध—पूर्व श्लोकात अर्जुनाने प्रार्थनापूर्वक जो प्रश्न केला होता त्याचे यथार्थ उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः॥ ३२॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **लोकक्षयकृत्** | = (मी) संपूर्ण लोकांचा नाश करणारा | **लोकान्** | = (ह्या सर्व) लोकांचा | **अवस्थिताः** | = उभे आहेत, |
| | | | | **सर्वे** | = (ते) सर्व |
| | | **समाहर्तुम्** | = संहार करण्यासाठी | **त्वाम्** | = तू |
| **प्रवृद्धः** | = विशाल | **प्रवृत्तः** | = (येथे) आलो आहे. | **ऋते, अपि** | = (युद्ध केले) नाहीस तरीही |
| **कालः** | = काळ | **प्रत्यनीकेषु** | = (तुझ्या) प्रतिपक्षात | | |
| **अस्मि** | = आहे (आणि) | **ये** | = जे | **भविष्यन्ति** | = राहणार |
| **इह** | = यावेळी (मी) | **योधाः** | = योद्धालोक | **न** | = नाहीत |

*व्याख्या*— [भगवंताचे विश्वरूप विचार केला असता फारच विलक्षण वाटते, कारण ते पाहण्यात अर्जुनाची दिव्य दृष्टी देखील काम करत नाही आणि ते विश्वरूप पाहणे फार कठीण आहे असे म्हणतात ''दुर्निरीक्ष्यं समन्तात्'' (११।१७) येथेही ते भगवंताना विचारतात की, उग्ररूपधारी आपण कोण आहात? असे वाटते की, जर अर्जुनाने भयभीत होऊन असे विचारले नसते, तर भगवान् आणखी विलक्षण रूपे दाखवितच राहिले असते. परंतु अर्जुनाने मध्येच प्रश्न केल्यामुळे भगवंतांनी पुढील रूप दाखविणे बंद केले आणि अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देऊ लागले.]

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धः**—पूर्व श्लोकात अर्जुनाने विचारले होते की, उग्ररूपधारी आपण कोण आहात?''**आख्याहि मे को भवानुग्ररूपः**'' त्याच्या उत्तरात विराट्‌रूपी भगवान् म्हणतात की, मी संपूर्ण लोकांचा क्षय (नाश) करणारा फार भयंकर रूपाने वाढलेला अक्षयकाळ आहे.

**लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः**—अर्जुनांनी विचारले होते की, मी आपल्या प्रवृत्तीला जाणत नाही ''**न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्**'' अर्थात् आपण या ठिकाणी कशासाठी आलात ? याच्या उत्तरात भगवान् म्हणतात की, मी या वेळी दोन्ही सैन्यांचा संहार करण्यासाठी आलो आहे.

**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः**—तू पूर्वी हे म्हटले होतेस की, मी युद्ध करणार नाही ''**न योत्स्ये**'' (२।९) तर तू युद्ध केले नाहीस तर, हे प्रतिपक्षी मरणार नाहीत का? अर्थात् तुझ्या युद्ध करण्याने अथवा युद्ध न करण्याने काहीही फरक पडणार नाही. कारण मी सर्वांचा संहार करण्यासाठी प्रवृत्त झालो आहे. ही गोष्ट तू विराटरूपातच पाहून घेतली आहेस की, तुझ्या पक्षाचे आणि विपक्षाचे दोन्ही सैन्य माझ्या भयंकर मुखात प्रविष्ट होत आहे.

येथे एक शंका येते की, अर्जुनाने आपल्या आणि कौरव पक्षाच्या सैन्यातील सर्व लोकांना भगवंताच्या मुखात जाऊन नष्ट होत असलेले पाहिले होते, तर मग भगवंतांनी येथे केवळ प्रतिपक्षाविषयीच का म्हटले की, तू युद्ध नाही केलेस तरी हे प्रतिपक्षी राहणार नाहीत. याचे समाधान असे आहे की, जर अर्जुनाने युद्ध केले असते तर त्यांनी प्रति पक्षीयांनाच मारले असते आणि युद्ध केले नसते तर त्यांनी प्रतिपक्षीयांना मारले नसते. म्हणून भगवान् म्हणतात की, तू मारले नाहीस तरी, हे प्रतिपक्षी वाचणार नाहीत; कारण मी काळरूपाने सर्वांना खाऊन टाकीन. तात्पर्य, या सर्वांचा संहार तर होणारच आहे. तू केवळ आपल्या युद्धरूपी कर्तव्यकर्माचे पालन कर.

एक शंका अशीही येते की, येथे भगवान् अर्जुनाला म्हणतात की, प्रतिपक्षाचे लोक तू युद्ध नाही केलेस तरी राहणार नाहीत, तर मग या युद्धात प्रतिपक्षाचे अश्वत्थामा इत्यादी योद्धे कसे वाचले? याचे समाधान असे आहे की, येथे भगवंतांनी त्याच योद्ध्यांच्या मरण्याविषयी म्हटले आहे, ज्यांना अर्जुन मारू शकतात आणि ज्यांना अर्जुन पुढे मारतील. म्हणून भगवंताच्या कथनाचे तात्पर्य, ज्या योध्यांना तू मारू शकतोस, ते सर्व तू मारले नाहीस तरी मरतील, ज्यांना तू पुढे मारशील ते माझ्याकरवी पूर्वीच मारले गेले आहेत—''**मयैवेते निहताः पूर्वमेव**'' (११।३३)

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, तू मारले नाही तरीही हे प्रतिपक्षी योद्धे राहणार नाहीत. अशा स्थितीत अर्जुनाने काय केले पाहिजे याचे उत्तर भगवंत पुढील दोन श्लोकांत देत आहेत.*

## तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्।
## मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | **समृद्धम्** | = धन-धान्याने संपन्न (अशा) | **निहताः** | = मारले गेले आहेत. |
| **त्वम्** | = तू (युद्धासाठी) | | | **सव्यसाचिन्** | = हे सव्यसाची अर्थात् दोन्ही हातांनी बाण चालवणारा अर्जुन! (तू ह्यांना मारण्यात) |
| **उत्तिष्ठ** | = उभा रहा (आणि) | **राज्यम्** | = राज्याचा | | |
| **यशः** | = यश | **भुङ्क्ष्व** | = भोग घे. | | |
| **लभस्व** | = प्राप्त कर (तसेच) | **एते, एव** | = हे सर्व | | |
| **शत्रून्** | = शत्रूंना | **मया** | = माझ्याद्वारा | **निमित्तमात्रम्** | = निमित्रमात्र |
| **जित्वा** | = जिंकून | **पूर्वम्, एव** | = पूर्वीच | **भव** | = हो. |

*व्याख्या*—**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व**—हे अर्जुन! जर तू हे पाहूनच घेतले आहेस की, तुझ्या मारल्याविनाही हे प्रतिपक्षी वाचणार नाहीत, तर मग तू कंबर बांधून युद्धाला उभा रहा आणि फुकटात यश मिळवून घे. याचे तात्पर्य, हे

सर्व अवश्यंभावी आहे, जे झाल्याशिवाय राहणार नाही आणि हे मी तुला प्रत्यक्ष दाखविलेही आहे. म्हणून तू युद्ध करशील, तर तुला फुकटात यश मिळेल आणि लोकही म्हणतील की, अर्जुनाने विजय मिळविला.

**यशो लभस्व**—म्हणण्याचा असा अर्थ नाही की, यश प्राप्त झाल्यावर तू खूश होऊन समजावे की, "वा मीच विजय मिळविला". उलट तू असे समजावे की, जसे हे प्रतिपक्षी, माझ्याकडून मारले गेलेलेच मरणार तसेच यशही जे मिळणार होते तेच मिळणार. जर तू मिळणारे यश आपल्या पुरुषार्थाने प्राप्त झाले असे मानून खूश होशील, तर तू फलात बांधला जाशील-"**फले सक्तो निबध्यते**" (५।१२). तात्पर्य लाभ-हानी, यश-अपयश, सर्व प्रभूच्या हातात आहे. म्हणून मनुष्याने यांच्याशी आपला संबंध जोडू नये, कारण हे तर अटळ होणारेच असते.

**जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्**— समृद्ध राज्यात दोन गोष्टी असतात (१) राज्य निष्कंटक असावे अर्थात् त्यात बाधा करणारा कोणीही शत्रू अथवा प्रतिपक्षी राहू नये आणि (२) राज्य धन-धान्याने संपन्न असावे अर्थात् प्रजेजवळ खूप धन-संपत्ती असावी. हत्ती, घोडे, गाय, जमीन, घर, जलाशय आदी आवश्यक वस्तू भरपूर असाव्या. प्रजेच्या खाण्यासाठी भरपूर अन्न असावे. या दोन्ही गोष्टींनीच राज्याची समृद्धता, पूर्णता होत असते. भगवान् अर्जुनाला म्हणतात, की शत्रूंना जिंकून तू निष्कंटक आणि धन-धान्याने संपन्न अशा राज्याचा भोग घे.

येथे राज्य भोगण्याचा अर्थ अनुकूलतेचे सुख भोगण्यात नाही, तर असा अर्थ आहे की, साधारण लोक ज्याला भोग मानतात, त्या राज्यालाही अनायास तू प्राप्त करून घे.

**मयैवेते निहताः पूर्वमेव**—तू फुकटात यश आणि राज्य कसे प्राप्त करून घेशील, याचा हेतू सांगतात की, येथे जितके काही लोक आले आहेत, त्या सर्वांचे आयुष्य समाप्त झाले आहे अर्थात् काळरूपी माझ्याकडून हे पूर्वीच मारले गेलेले आहेत.

**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्**—डाव्या हाताने बाण चालवण्यामुळे अर्थात् उजव्या आणि डाव्या दोन्ही हाताने बाण चालवण्यामुळे अर्जुनाचे नाव "**सव्यसाची**" पडले होते.* या नावाने संबोधित करून भगवान् अर्जुनाला हे सांगतात की, तू दोन्ही हातांनी बाण चालव अर्थात् युद्धात आपली स्वत:ची पूर्ण शक्ती खर्च कर परंतु निमित्तमात्र होऊन! निमित्तमात्र बनण्याचे तात्पर्य, आपले बल, बुद्धी, पराक्रम इत्यादीना कमी खर्च करावे असे नसून त्यांचा सावधानीपूर्वक पूर्णपणे वापर केला पाहिजे. परंतु मी मारले, मी विजय मिळविला असा अभिमान करू नये. कारण हे सर्व लोक माझ्याकरवी पूर्वीच मारले गेलेले आहेत. म्हणून तुला केवळ निमित्तमात्र बनायचे आहे, काही नवीन काम करावयाचे नाही.

निमित्तमात्र बनून कार्य करण्यात आपल्याकडून कोणत्याही अंशात कोणती कमी राहता कामा नये. तर पूर्ण शक्ती खर्च करून सावधानीपूर्वक कार्य केले पाहिजे. कार्याच्या सिद्धीत आपल्या अभिमानाचा किंचितमात्रही अंश ठेवता कामा नये. जसे भगवान् श्रीकृष्णांनी गोवर्धन पर्वत उचलला त्यावेळी त्यांनी गोपाळांनाही आपापल्या काठ्या पर्वताला आधार व्हावा म्हणून लावण्यासाठी सांगितले. सर्व गोपाळांनी आपापल्या काठ्या पर्वताखाली लावल्या आणि ते असे समजू लागले की, आमच्या सर्वांच्या काठ्या लावण्यानेच पर्वत वर अधर राहिला आहे. वास्तविक, तो पर्वत भगवंताच्या डाव्या हाताच्या करंगुळीच्या नखावर होता. गोपाळांना जेव्हा अशा प्रकारचा अभिमान झाला तेव्हा, भगवंतांनी आपली करंगुळी थोडी खाली केली. करंगुळी खाली करताच पर्वत खाली येऊ लागला, तेव्हा सर्व गोपाळ ओरडू लागले. "दादा! मेलो रे मेलो" भगवंत म्हणाले, जोराने शक्ती लावा. परंतु त्यांनी पूर्ण शक्ती खर्च करून काठ्या लावल्या तरी पर्वत उचलू शकले नाहीत, तेव्हा भगवंतांनी पुन्हा आपल्या करंगुळीने पर्वताला उचलले. त्याचप्रमाणे साधकांनी परमात्मप्राप्तीसाठी आपले बळ, बुद्धी, योग्यता इत्यादींना तर पूर्णपणे उपयोगात आणले पाहिजे, त्यात कधी किंचित्-मात्रही उणीव ठेवता कामा नये. परंतु परमात्म्याचा अनुभव होण्यात बळ, प्रयत्न, योग्यता, तत्परता, जितेंद्रियता, परिश्रम इत्यादीना कारण मानून अभिमान करता कामा नये. त्यात तर केवळ भगवंताच्या कृपेलाच कारण मानले पाहिजे. भगवंतानी-ही गीतेत म्हटले आहे की, शाश्वत अविनाशी पदाची प्राप्ती माझ्या कृपेने होईल. "**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्**" (१८।५६) आणि संपूर्ण विघ्नांमधून माझ्या कृपेने तरून जाशील—"**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**" (१८।५८). यावरुन हे सिद्ध झाले की, केवळ निमित्तमात्र बनण्याने साधकाला परमात्म्याची प्राप्ती होत असते.

जेव्हा साधक आपल्या बळावर साधन करतो, तेव्हा त्याला आपल्या बळाचा आधार घेतल्याने वारंवार विफलतेचा

* उभौ मे दक्षिणौ पाणी गाण्डीवस्य विकर्षणे।
तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदु:॥ (महाभारत विराट० ४४।१९)

अनुभव येत असतो आणि तत्त्वाच्या प्राप्तीत उशीर लागतो. जर साधकाने आपल्या बळाचा किंचिन्मात्रही अभिमान केला नाही तर, सिद्धी तात्काळ मिळत असते. कारण परमात्मा तर नित्यप्राप्त आहेतच, केवळ आपल्या पुरुषार्थाचा अभिमान केल्यानेच त्यांचा अनुभव येत नसतो. या पुरुषार्थाच्या अभिमानाला दूर करण्यासाठीच "**निमित्तमात्रं भव**" पदाचे तात्पर्य आहे.

कर्मात जो आपल्या करण्याचा अभिमान असतो की, "मी करत आहे म्हणूनच होत आहे, जर मी केले नाही तर काहीही होणार नाही" हा अभिमान केवळ अज्ञानामुळेच आपल्या स्वत:त आरोपित करून ठेवलेला असतो. जर मनुष्य अभिमान आणि फलेच्छेचा त्याग करून, प्राप्त परिस्थितीनुसार कर्तव्यकर्म करण्यात निमित्तमात्र बनला तर, त्याचा उद्धार स्वत:सिद्ध आहे. कारण जे होणार आहे ते होणारच. त्याला कोणीही आपल्या शक्तीने रोखू शकत नाही आणि जे होणारे नसेल ते होणार नाही त्याला कोणीही आपल्या बल-बुद्धीने घडवून आणू शकत नाही. म्हणून सिद्धी-असिद्धीमध्ये सम राहून कर्तव्यकर्मांचे पालन केले गेले तर, मुक्ती स्वत:सिद्ध आहे. बंधन, नरकांची प्राप्ती, चौऱ्यांशी लाख योनींची प्राप्ती हे सर्व कृतिसाध्य आहे आणि मुक्ती, कल्याण, भगवत्प्राप्ती भगवत्प्रेम इत्यादी सर्व स्वत:सिद्ध आहे.

**परिशिष्ट भाव**—येथे काळरूपाने सर्वांचा संहार करणे ही भगवंताची लीला आहे. ही लीला दाखवून भगवान् अर्जुनाला जणू हे सांगू इच्छितात की, जर तू युद्ध केले नाहीस तरीही तुझ्या प्रतिपक्षातील योद्ध्यांचा विनाश अवश्यंभावी आहे.

'**निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्**'—निमित्तमात्र बनण्याचे तात्पर्य हे नाही की, नाममात्र कर्म करणे तर याचे तात्पर्य असे आहे की, आपली संपूर्ण शक्ती लावावी परंतु स्वत:ला कारण समजू नये अर्थात् आपल्या प्रयत्नात उणीवही ठेवू नये आणि स्वत:ला अभिमानही होऊ देऊ नये. भगवंतांनी जे काही बल, विद्या, योग्यता इत्यादी दिले आहे, ते सर्व उपयोग करण्यासाठी दिले आहे. परंतु आपले पूर्ण सामर्थ्य लावूनही आपण त्यांना प्राप्त करू शकत नाही. प्राप्ती तर त्यांच्या कृपेनेच होईल.

भगवंतांनी त्यांच्याकडून आपल्यावर कृपा करण्यात कोणती उणीव ठेवली नाही. जसे वासरू एका स्तनाचेच दूध पिते परंतु भगवंतांनी गायीला चार स्तन दिले आहेत, तसेच भगवान् चहू बाजूंनी आमच्यावर कृपा करीत आहेत. आपणाला तर केवळ निमित्रमात्र बनावयाचे आहे. अर्जुनाच्या पुढे तर युद्ध होते. म्हणून भगवान् त्यांना म्हणतात की, तू निमित्तमात्र होऊन युद्ध कर, तुझा विजय होईल. त्याचप्रमाणे आपल्यापुढे संसार आहे, म्हणून आपणही निमित्तमात्र बनून साधन करावे म्हणजे संसारावर आपल्याला विजय प्राप्त होईल.

## द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।
## मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्॥ ३४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **द्रोणम्** | = द्रोणाचार्यांना | **तथा** | = तथा | **मा, व्यथिष्ठा:** | = तू व्यथा मानू नकोस |
| **च** | = आणि | **अन्यान्, अपि** | = अन्य सर्वच | **युध्यस्व** | = (आणि) युद्ध कर. |
| **भीष्मम्** | = भीष्माचार्यांना | **मया** | = माझ्याद्वारा | **रणे** | = युद्धात (तू नि:संन्देह) |
| **च** | = तसेच | **हतान्** | = मारल्या गेलेल्या | **सपत्नान्** | = शत्रूंना |
| **जयद्रथम्** | = जयद्रथाला | **योधवीरान्** | = शूरवीरांना | **जेतासि** | = जिंकशील. |
| **च** | = आणि | **त्वम्** | = तू | | |
| **कर्णम्** | = कर्णाला | **जहि** | = मार | | |

*व्याख्या*—**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् मया हतांस्त्वं जहि**—तुझ्या दृष्टीत गुरू द्रोणाचार्य, पितामह भीष्माचार्य, जयद्रथ आणि कर्ण तसेच इतर जितके प्रतिपक्षाचे प्रसिद्ध शूरवीर आहेत, ज्यांच्यावर विजय मिळविणे फार कठीण काम आहे*. त्या सर्वांचे आयुष्य समाप्त झाले आहे, अर्थात् काळरूपी माझ्याकडून ते मारले गेलेले आहेत. म्हणून हे अर्जुन! माझ्याकरवी मारलेल्या शूरवीरांना तू ठार कर.

* भीष्माचार्य, द्रोणाचार्य आणि कर्ण आपल्या शूरवीरतेमुळे संसारात प्रसिद्ध होते. म्हणून त्यांना जिंकणे कठीण होते. जयद्रथ तर असा काही नामी शूरवीर नव्हता, परंतु त्याला एक वरदान होते की, तुझे शीर जो कोणी पृथ्वीवर पाडील, तर त्या शीर पाडणाऱ्याच्या शीराचे शंभर तुकडे होतील. या वरदानामुळे जयद्रथाला मारण्यात कठीणता होती.

पूर्व श्लोकात भगवंताच्या "**मयैवैते निहताः पूर्वमेव**" आणि येथे "**मया हतांस्त्वं जहि**" म्हणण्याचे तात्पर्य, तू यांच्यावर विजय मिळव परंतु विजयाचा अभिमान करू नको, कारण हे सर्व माझ्याकरवी पूर्वीच मारले गेलेले आहेत.

**मा व्यथिष्ठा युध्यस्व**—अर्जुन पितामह भीष्माचार्य, आणि गुरू द्रोणाचार्यांना मारण्यात पाप समजत होते, हीच अर्जुनाच्या मनाची व्यथा होती. म्हणून भगवान् म्हणत आहेत की, याविषयीही तुला व्यथा व्हावयास नको अर्थात् भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य इत्यादींना मारण्याने हिंसा होईल, असा विचार मनात आणण्याची मुळीच आवश्यकता नाही. तू आपल्या क्षात्रधर्माचे अनुष्ठान कर अर्थात् युद्ध कर. याचा त्याग करू नकोस.

**जेतासि रणे सपत्नान्**—या युद्धात् तू शत्रूवर विजय मिळवशील. असे म्हणण्याचे तात्पर्य, पूर्वी (२।६ मध्ये) अर्जुनाने म्हटले होते की, आमचा विजय होणार किंवा त्यांचा विजय होणार हे मला काही कळत नाही, या संबंधात त्यांना संशय होता. येथे अकराव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी अर्जुनाला विश्वरूप पाहून घेण्याची आज्ञा केली, त्यावेळी भगवान् म्हणाले, तुला आणखी काही पाहून घ्यावयाचे असेल ते पाहून घे (११।७) अर्थात् कोणाचा विजय होणार आणि कोणाचा पराजय होणार तेही तू पाहून घे. मग भगवंतांनी विराटरूपाच्या अंतर्गत भीष्माचार्य, द्रोणाचार्य, आणि कर्ण यांच्या नाशाचे दृष्य दाखवले आणि या श्लोकात स्पष्टपणे सांगितले की, युद्धात निश्चित तुझा विजय होईल.

**विशेष गोष्ट**

साधकाला आपल्या साधनेत नाशवान् पदार्थांचे, व्यक्तींचे बाधकरूपाने जे आकर्षण वाटते त्या कारणाने तो घाबरून जातो की, माझा प्रयत्न या आकर्षणाला नष्ट करण्यात उपयोगी पडत नाही म्हणून हे आकर्षण कसे मिटेल? भगवान् "**मयैवैते निहताः पूर्वमेव**" आणि "**मया हतांस्त्वं जहि**" पदांनी धैर्य देऊन जणू हे आश्वासन देत आहेत की, तुला आपल्या साधनेंत ज्या वस्तू इत्यादीचे आकर्षण वाटत आहे आणि वृत्ती मलिन होत असल्याचे वाटत आहे, ही संपूर्ण विघ्ने नाशवान् आहेत आणि माझ्याकरवी त्यांचा नाश केलेलाच आहे. म्हणून साधकाने त्यांना महत्त्व देऊ नये.

"दुर्गुण दुराचार नष्ट होत नाहीत, काय करू?" अशी चिंता ज्यावेळी निर्माण होते, त्यावेळी त्याला साधकाचा अभिमानच कारणीभूत असतो आणि "**हे लवकर नष्ट झाले पाहिजेत**" या संबंधात भगवंतावरील विश्वासाची, भरवशाची, आश्रयाची उणीव असते. दुर्गुण-दुराचार न आवडणे हा दोष नव्हे, तर त्याविषयी चिंता करणे हा दोष आहे. म्हणून साधकाने कधीही चिंता करू नये.

"माझ्याकरवी मारलेल्यानांच तू ठार कर" या म्हणण्यात ही शंका येते की, काळरूपी भगवंताकरवी सर्वचे सर्व मारले गेलेलेच असतात तर संसारात एखादा एखाद्याला ठार करतो तर भगवंताकरवी मारलेल्यालाच मारत असतो. म्हणून ठार करणाऱ्याला पाप लागू नये. याचे समाधान असे आहे की, कोणालाही ठार करण्याचा किंवा दुःख देण्याचा अधिकार कोणालाही नाही. प्रत्येकाला दुसऱ्याची सेवा करण्याचा, सर्वांना सुख पोहचविण्याचा अधिकार आहे. जर ठार करण्याचा अधिकार मनुष्याला असता तर विधि-निषेध अर्थात् शुभ कर्म करा, अशुभ कर्म करू नका—असे शास्त्रांचे गुरुजनांचे आणि संतांचे म्हणणे व्यर्थ झाले असते. हा विधि-निषेध कोणाला लागू झाला असता? म्हणून मनुष्याने जर कोणाला ठार केले अथवा दुःख दिले तर त्याला पाप लागेलच, कारण त्याची ही क्रिया राग-द्वेषपूर्वक अनधिकारी क्रिया असते. परंतु क्षत्रियांसाठी शास्त्रविहित युद्ध प्राप्त झाले तर ते स्वार्थ आणि अहंकाराचा त्याग करून कर्तव्यपालन म्हणून केल्याने पाप लागत नाही, कारण तो क्षत्रियांचा स्वधर्म आहे.

**परिशिष्ट भाव**—भगवान् अर्जुनाला म्हणतात की, हे सर्व शूरवीर माझ्याकडून पूर्वीच मारले गेले आहेत. यावरुन हे समजून घ्यावे की, साधकाचे राग-द्वेष, काम-क्रोध इत्यादीही पूर्वीच मारले गेलेले आहेत अर्थात् सत्तारहित आहेत. त्यांना आपणच सत्ता आणि महत्ता देऊन आपल्यात स्वीकार केला आहे. वास्तविक यांची स्वतंत्र सत्ता नाहीच—'**नासतो विद्यते: भाव:**' (गीता २।१६).

***संबंध***—*विराटरूपी भगवंताच्या अत्यंत उग्ररूपाला पाहून अर्जुनाने एकतीसाव्या श्लोकात विचारले होते की, आपण कोण आहात आणि काय करण्यासाठी येथे आला आहात? बत्तीसाव्या श्लोकात भगवंतांनी उत्तर दिले की, मी वाढलेला काळ आहे आणि सर्वांचा संहार करण्यासाठी येथे आलो आहे. पुढे तेहेतीसाव्या-चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला आश्वासन दिले आहे की, माझ्याकरवी मारलेल्यांनाच तू ठार कर, तुझा विजय होईल. यानंतर अर्जुनाने काय केले—हे संजय पुढील श्लोकात सांगत आहेत.*

*सञ्जय उवाच*

# एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी। नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य॥ ३५॥

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **केशवस्य** | = भगवान् केशवाचे | **किरीटी** | = किरीटधारी अर्जुनाने | **एव** | होऊन |
| **एतत्** | = हे | | | **भूयः** | = पुन्हा |
| **वचनम्** | = वचन | **कृताञ्जलिः** | = हात जोडून | **प्रणम्य** | = प्रणाम करून |
| **श्रुत्वा** | = ऐकून | **नमस्कृत्वा** | = नमस्कार करून (आणि) | **सगद्गदम्** | = गद्गद वाणीने |
| **वेपमानः** | = (भयाने) कंपित झालेल्या | | | **कृष्णम्** | = भगवान् कृष्णांना |
| | | **भीतभीतः,** | = अत्यंत भयभीत | **आह** | = म्हटले. |

*व्याख्या*—**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी**—अर्जुन तर पूर्वीपासून भयभीत होतेच, यावर पुन्हा भगवंतांनी ''मी काळ आहे सर्वांना खाऊन टाकीन'' असे म्हणून जणू भ्यालेल्याला आणखी भीती दाखविली. तात्पर्य, ''**कालोऽस्मि**'' येथपासून ''**मया हतास्त्वं जहि**'' येथपर्यंत भगवंतांनी केवळ नाशाविषयीच सांगितले. हे ऐकून भीतीने व्याकूळ होऊन अर्जुन हात जोडून वारंवार नमस्कार करू लगले.

अर्जुनाने इंद्राला जेव्हा युद्धात साहाय्य करून काल, खञ्ज इत्यादी राक्षसांना ठार केले होते तेव्हा इंद्राने प्रसन्न होऊन अर्जुनाला सूर्यासारखा प्रकाश असणारा असा तेजस्वी एक दिव्य (मुकुट) ''किरीट'' दिला होता. या कारणानेच अर्जुनाचे नाव ''किरीटी'' पडले होते.* येथे ''किरीटी'' म्हणण्याचे तात्पर्य, ज्यांनी मोठमोठ्या राक्षसांना ठार करून इंद्राला साहाय्य केले, असे अर्जुनही भगवंताच्या विराट रूपाला पाहून थरथर कापत आहेत.

**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य**—काळ सर्वांचे भक्षण करतो कोणालाही सोडत नाही. कारण ही भगवंताची संहारशक्ती आहे. जी नित्य-निरंतर संहार करतच राहते. या वेळी जेव्हा भगवंताच्या अत्यंत उग्र विराटरूपाला अर्जुनाने पाहिले, तेव्हा त्यांना भगवंत काळाचेही काळ आहेत अशी जाणीव झाली. त्यांच्याशिवाय काळापासून वाचविणारा दुसरा कोणीच नाही. म्हणून अर्जुन भयभीत होऊन भगवंताला वारंवार नमस्कार करत आहेत.

**भूयः**—म्हणण्याचे तात्पर्य, पूर्वी पंधराव्यापासून एक-तीसाव्या श्लोकापर्यंत अर्जुनाने भगवंताची स्तुती आणि नमस्कार केला, आता पुन्हा भगवंताची स्तुती आणि नमस्कार करत आहेत.

हर्षानेही वाणी गद्गद होते आणि भयानेही ! येथे भीतीचा विषय आहे. जर अर्जुन अधिक भयभीत झाले असते तर ते बोलूच शकले नसते. परंतु अर्जुन गद्गद वाणीने बोलत आहेत. यावरुन सिद्ध होते की, ते इतके भयभीत झाले नाहीत.

***संबंध**—आता पुढील श्लोकापासून अर्जुन भगवंताची स्तुती आरंभ करतात.*

*अर्जुन उवाच*

# स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च। रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः॥ ३६॥

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हृषीकेश** | = हे अंतर्यामी भगवन्! | **प्रकीर्त्या** | = (नाम, गुण, लीला यांचे) कीर्तन केल्याने | **प्रहृष्यति** | = हर्षित होत आहे |
| | | | | **च** | = आणि |
| **तव** | = आपल्या | **जगत्** | = हे संपूर्ण जगत | **अनुरज्यते** | = अनुरागाला (प्रेमाला) |

* पुरा शक्रेण मे दत्तं युध्यतो दानवर्षभैः। किरीटं मूर्ध्नि सूर्याभं तेनाहुर्मां किरीटिनम्॥ (महाभारत विराट० ४४।१७)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | प्राप्त होत आहे. | **दिशः** | = दाही दिशांना | **नमस्यन्ति** | = आपणाला नमस्कार करीत आहेत. |
| **भीतानि** | = (आपल्या नाम, गुण इत्यादीच्या कीर्तनाने) भयभीत होऊन | **द्रवन्ति** | = पळत आहेत | | |
| | | **च** | = आणि | | |
| | | **सर्वे** | = संपूर्ण | **स्थाने** | = हे सर्व होणे उचितच आहे. |
| **रक्षांसि** | = राक्षस लोक | **सिद्धसङ्घाः** | = सिद्धगण | | |

***व्याख्या***— [संसारात असे पाहण्यात येते की, जो माणूस अत्यंत भयभीत असतो तो बोलू शकत नाही. अर्जुन भगवंताचे अत्यंत उग्ररूप पाहून भयभीत झाले होते. मग त्यांनी या (छत्तीसाव्या) श्लोकापासून सेहेचाळीसाव्या श्लोकापर्यंत भगवंताची स्तुती कशी केली? याचे समाधान असे आहे की, जरी अर्जुन भगवंताच्या अत्यंत उग्र भयानक विश्वरूपाला पाहून भयभीत होत होते, तरीपण ते भयभीत होण्याबरोबरच हर्षितही होत होते. जसे अर्जुनांनी पुढे म्हटले आहे **''अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे''** (११।४५) यावरुन असे सिद्ध होते की, अर्जुन भगवंताची स्तुती करण्यासही असमर्थ होण्या इतके भयभीत झाले नव्हते.]

**हृषीकेश**—इंद्रियांना ''हृषीक'' म्हणतात आणि त्यांचे ईश अर्थात् स्वामी भगवान् आहेत. या ठिकाणी हे संबोधन देण्याचे तात्पर्य, आपण सर्वांच्या हृदयात विराजमान राहून इंद्रिये, अंत:करण इत्यादींना सत्ता स्फूर्ति देणारे आहात.

**तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च**—संसाराशी विमुख होऊन आपणाला प्रसन्न करण्यासाठी भक्तलोक आपल्या नावाचे, गुणांचे कीर्तन करतात, आपल्या लीलांची पदे (अभंग) गातात, आपल्या चरित्राचे वर्णन करतात आणि श्रवण करतात. यामुळे संपूर्ण जग हर्षित होते. तात्पर्य, संसाराशी सन्मुख होऊन वर्तन करण्याने तर सर्वांना ताप होतो, परस्पर राग-द्वेष उत्पन्न होतात; परंतु जे आपल्या सन्मुख होऊन आपले भजन कीर्तन करतात, त्यांच्याकरवी संपूर्ण जीवांना शांती मिळत असते, संपूर्ण जीव प्रसन्न होतात. त्या जीवांना ह्या गोष्टीची जाणीव होवो अथवा न होवो; परंतु परिणाम मात्र अवश्य होत असतो.

ज्याप्रमाणे भगवान् अवतार घेतात, त्या वेळी संपूर्ण स्थावर-जंगम, जड-चेतन जगत् हर्षित होत असते, अर्थात् वृक्ष, लता इत्यादी स्थावर, देवता, मनुष्य, ऋषी, मुनी, किन्नर, गंधर्व, पशू, पक्षी इत्यादी जंगम, नदी, सरोवर इत्यादी जड सर्वचे सर्व प्रसन्न होतात. त्याचप्रमाणे भगवंताचे नाम, लीला, गुण इत्यादीच्या कीर्तनाचा सर्वांवर परिणाम होतो आणि सर्व हर्षित होतात.

भगवंताच्या नाम आणि गुणांचे कीर्तन करण्याने जेव्हा मानव हर्षित होतात अर्थात् त्यांचे मन भगवंताचे ठिकाणी तल्लीन होते तेव्हा (भगवंताकडे वृत्ती वळल्याने) त्यांच्या ठिकाणी भगवंताविषयी अनुराग, प्रेम उत्पन्न होते.

**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति**—जितके राक्षस आहेत, भूत, प्रेत, पिशाच आहेत ते सर्वचे सर्व आपल्या नाम व गुणांचे कीर्तन करण्याने, आपल्या चरित्रांचे पठन कथन करण्याने भयभीत होऊन पळून जातात.*

राक्षस, भूत, प्रेत इत्यादीच्या भयभीत होऊन पळून जाण्यात, भगवंताचे नाम, गुण इत्यादी कारण नाहीत, तर त्यांचे आपले स्वत:चे पापच कारण आहे. आपल्या स्वत:-च्या पापामुळेच ते पवित्रातीपवित्र आणि मंगलस्वरूपी भगवंताच्या गुण गाण्याला सहन करू शकत नाहीत आणि ज्या ठिकाणी गुणगान होत असते त्या ठिकाणी ते टिकू शकत नाहीत, जर त्यापैकी कोणी टिकला तर त्याचा सुधार होतो, त्याची ती दुष्ट योनी समाप्त होते आणि त्याचे कल्याण होते.

**सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः**—सिद्धांचे, संत महात्म्यांचे आणि भगवंताकडे वाटचाल करणाऱ्या साधकांचे जितके समुदाय आहेत ते सर्वचे सर्व आपले नाम, गुणांचे कीर्तन तसेच आपल्या लीला श्रवण करून आपणाला नमस्कार करतात.

ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, हे सर्व दृश्य भगवंताच्या नित्य, दिव्य, अलौकिक विराटरूपातच आहे. त्यातच एकापेक्षा एक विचित्र लीला होत आहेत.

**स्थाने**—हे सर्व यथोचितच आहे आणि असेच व्हावयास पाहिजे आणि असेच होत आहे. कारण आपल्या सन्मुख होण्याने शांती, आनंद, प्रसन्नता प्राप्त होते, विघ्नांचा नाश होतो आणि आपल्या विमुख झाल्यास दु:खच दुख, अशांतीच अशांती होते. तात्पर्य, आपला अंश असलेला जीव आपल्या सन्मुख झाल्यास सुखी होतो, त्याचे ठिकाणी शांती, क्षमा, नम्रता इत्यादी गुण

* न यत्र श्रवणादीनि रक्षोघ्नानि स्वकर्मसु। कुर्वन्ति सात्वतां भर्तुर्यातुधान्यश्च तत्र हि॥ (श्रीमद्भा० १०।६।३)

जेथे लोक आपल्या दैनंदिन कामात राक्षसांना दूर घालवणाऱ्या भगवंताचे नाम, गुण, लीला श्रवण, कीर्तन इत्यादी करत नाहीत तेथेच राक्षसांचे बळ चालते.

प्रगट होतात आणि आपल्या विमुख झाल्यास दुःखी होतो. हे सर्व उचितच आहे.

हा जीवात्मा, परमात्मा आणि संसार या मधला आहे. हा स्वरूपाने तर साक्षात् परमात्म्याचा अंश आहे आणि याने प्रकृतीशी संबंध प्रस्थापित केला आहे. आता हा जस-जसा प्रकृतीकडे झुकतो, तस-तसे याचे ठिकाणी भोग आणि संग्रहाची इच्छा वाढत जाते. संग्रह आणि भोगाच्या प्राप्ती-साठी हा जस-जसा प्रयत्न करतो, तस-तसे याचे ठिकाणी अभाव, अशांती, दुःख, ताप, संताप इत्यादी वाढत जातात. परंतु संसाराशी विमुख होऊन हा जीवात्मा जस-जसा भगवंता-कडे सन्मुख होतो, तस-तसा हा आनंदित होतो आणि याचे दुःख समाप्त होत जाते.

**परिशिष्ट भाव—**येथे '**स्थाने**' पद पुढे आणि मागे—दोन्ही ठिकाणी आलेल्या श्लोकांसाठी समजावे. भगवंताने बत्तीसाव्या, तेहतीसाव्या आणि चौतीसाव्या श्लोकात जी गोष्ट सांगितली होती आणि जी गोष्ट या श्लोकात सांगितली आहे, त्यासाठी अर्जुन म्हणतात की, 'प्रतिपक्षातील सर्व योद्धे माझ्याद्वारा मारले गेले आहेत, तू केवळ निमित्त हो' इत्यादी जे काही आपण म्हटले आहे ते आपले कथन उचितच आहे. 'आपल्या नाम, गुण इत्यादीचे कीर्तन करण्याने जगत हर्षित होत आहे आणि राक्षसलोक भयभीत होऊन पळत आहेत' इत्यादी जे काही होत आहे ते देखील योग्यच होत आहे. आपल्याद्वाराच ही सर्व लीला होत आहे, माझ्याद्वारा नव्हे.

*संबंध—पूर्व श्लोकात ''स्थाने'' पदाने जे औचित्य दाखविले त्याची पुष्टी पुढील चार श्लोकांत करतात.*

## कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे।
## अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्॥ ३७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महात्मन्** | = हे महात्मन्! (आपण) | **न, नमेरन्** | नाहीत? | | सत्‌ही आहात, |
| **गरीयसे** | = गुरूंचेही गुरू | **अनन्त** | = (कारण) हे अनंत! | **असत्** | = असत्‌ही आहात (आणि) |
| **च** | = आणि | **देवेश** | = हे देवेश! | **तत्परम्** | = त्याच्या (सत्-असत्‌च्या) पलीकडेही |
| **ब्रह्मणः, अपि** | = ब्रह्मदेवाचेही | **जगन्निवास** | = हे जगन्निवास! | | |
| **आदिकर्त्रे** | = आदिकर्ता (आहात) | **त्वम्** | = आपण | | |
| **ते** | = (मग ते सिद्धगण) आपणास | **अक्षरम्** | = अक्षरस्वरूप आहात, | **यत्** | = जे काही आहे, (तेही आपणच आहात.) |
| **कस्मात्** | = का नमस्कार करणार | **सत्** | = (आपण) | | |

*व्याख्या—* **कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे**—आदिरूपाने प्रगट होणाऱ्या महान् स्वरूपी आपणास ते (पूर्वोक्त सिद्धगण) नमस्कार का करणार नाहीत? नमस्कार दोघांना केला जातो. (१) ज्यांच्याकडून मनुष्याला बोध, प्रकाश मिळतो, असे आचार्य, गुरुजन इत्यादीना नमस्कार केला जातो (२) ज्यांच्यापासून आपला जन्म झाला त्या माता, पित्यांना तसेच वयाने, विद्येने आपल्यापेक्षा श्रेष्ठ असलेल्या पुरुषांना नमस्कार केला जातो. अर्जुन म्हणतात की, आपण गुरूंचे गुरू आहात. ''**गरीयसे**'' *आणि आपण सृष्टीची रचना करणाऱ्या पितामह ब्रह्मदेवालाही उत्पन्न करणारे आहात ''**ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे**''. म्हणून सिद्ध पुरुष आपणाला नमस्कार करत आहेत, हे उचितच आहे.

**अनन्त—**आपणाला देश, काळ, वस्तू, व्यक्ती इत्यादी कोणत्याही दृष्टीने पाहिले तरी, आपला अंत लागत नाही. तात्पर्य, देशाच्या दृष्टीने पाहिले तर, आपला आरंभ कोठून झाला आहे आणि कोठे अंत होणार आहे असे काही नाहीच. काळाच्या दृष्टीने पाहिले तर, आपण केव्हापासून आहात आणि केव्हापर्यंत राहणार आहात याचा काही अंत लागत नाही. वस्तू, व्यक्ती इत्यादीच्या दृष्टीने पाहिले तर, आपण वस्तू, व्यक्ती इत्यादी किती रूपात आहात याचा काही आदी आणि अंत नाही. सर्व दृष्टीने आपण अनंतच अनंत आहात. बुद्धी इत्यादी आपणास पाहू लागल्या तर त्यांची दृष्टी संपून जाते परंतु आपला अंत लागत नाही. म्हणून सर्व दृष्टीने आपण सीमारहित आहात, अपार अहात, आगाध आहात.

* पतञ्जलि महाराजांनी म्हटले आहे की, ते परमात्मा, अगदी प्रथम जे ब्रह्मादिक प्रगट झाले, त्यांचेही गुरू आहेत-''पूर्वेषामपि गुरुः'' योगदर्शन (१।२६)

**देवेश**—इंद्र, वरुण इत्यादी अनेक देवता आहेत, ज्यांचे शास्त्रांत वर्णन आले आहे. त्या सर्व देवतांचे आपण स्वामी आहात, नियन्ते आहात, शासक आहात. म्हणून आपण ''देवेश'' आहात.

**जगन्निवास**—आपल्या कोण्या एका अंशात अनंत सृष्टी विस्तृतरूपाने निवास करत आहेत तरीही तो अंश आपला पूर्ण होत नाही तर, रिकामाच राहतो. असे आपण असीम ''जगन्निवास'' आहात.

**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्**—आपण अक्षरस्वरूपी आहात* ज्याची स्वत: सिद्ध स्वतंत्र सत्ता आहे, ते ''सत्'' ही आपणच आहात आणि ज्याची स्वतंत्र सत्ता नाही तर, सत्च्या आश्रितच ज्याची सत्ता असल्याने दिसते ते, ''असत्'' ही आपणच आहात. जे सत् आणि असत् याहून विलक्षण आहे, ज्याचे कोणत्याही प्रकाराने वर्णन होऊ शकत नाही, मन-बुद्धी इत्यादीनीही ज्यांची कल्पना केली जाऊ शकत नाही अर्थात् जे संपूर्ण कल्पनातीत आहे तेही आपणच आहात.

तात्पर्य आपल्यापेक्षा श्रेष्ठ दुसरा कोणीही नाहीच, होऊ शकत नाही आणि होणे शक्यही नाही. अशा आपणास नमस्कार करणे उचितच आहे.

**परिशिष्ट भाव**—नवव्या अध्यायात आलेल्या '**सदसच्चाहम्**' (९। १९) पदाने आणि येथे आलेल्या '**सदसत्तत्परं यत्**' पदांनी परमात्म्याच्या सगुणरूपाची अनंतता, समग्रता सिद्ध होते.

सत् आणि असत्—दोन्ही सापेक्ष असल्यामुळे लौकिक आहेत आणि तो यांच्याहून पलीकडे आहे तो निरपेक्ष असल्यामुळे अलौकिक आहे. लौकिक आणि अलौकिक—दोन्हीही समग्र परमात्म्याची रूपे आहेत. परमात्म्याची परा आणि अपरा प्रकृती सत्-असत्च्या पलीकडे नाही, परंतु परमात्मा सत्-असत् च्या पलीकडेही आहेत—'**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनञ्जय**' (गीता ७। ७)

सगुणाच्या (समग्राच्या) अंतर्गत तर निर्गुण येऊ शकते, परंतु निर्गुणाच्या अंतर्गत सगुण येऊ शकत नाही. कारण सगुणात निर्गुणाचा निषेध नाही. परंतु निर्गुणात गुणांचा निषेध आहे. म्हणून निर्गुण एकदेशीय होते अर्थात् त्याच्या अंतर्गत सर्व काही येत नाही. परंतु सगुणाच्या (समग्राच्या) अंतर्गत सर्व काही येते, काहीही बाकी राहत नाही. म्हणून अर्जुन '**सदसत्तत्परं यत्**' पदांनी जणू हे म्हणत आहेत की, सत्ही आपण आहात, असत्ही आपण आहात आणि सत्-असत्च्या शिवाय जे काही आमच्या कल्पनेत येऊ शकते तेही आपणच आहात. ज्ञानाच्या दृष्टीने जे सत्ही म्हटले जाऊ शकत नाही आणि असत्ही म्हटले जाऊ शकत नाही, ते अनिर्वचनीय तत्त्वसुद्धा आपणच आहात—'**न सत्तन्नासदुच्यते**' (गीता १३। १२). तात्पर्य, आपल्याशिवाय कोणीही झाले नाही, कोणीही नाही, कोणीही होणार नाही आणि कोणी होऊही शकत नाही अर्थात् केवळ आपणच आपण आहात.

## त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।
## वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप॥ ३८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वम्** | = आपण (च) | **विश्वस्य** | = संसाराचे | **च** | = आणि |
| **आदिदेवः** | = आदिदेव | **परम्** | = परम | **परम्, धाम** | = परमधाम |
| **च** | = आणि | **निधानम्** | = आश्रय आहात. | **असि** | = आहात. |
| **पुराणः, पुरुषः** | = पुराण पुरुष आहात (तथा) | **वेत्ता** | = (आपणच) सर्वांना जाणणारे, | **अनन्तरूप** | = हे अनंतरूप! |
| | | | | **त्वया** | = आपल्याने (च) |
| **त्वम्** | = आपण (च) | | | **विश्वम्** | = संपूर्ण संसार |
| **अस्य** | = ह्या | **वेद्यम्** | = जाणण्याला योग्य | **ततम्** | = व्याप्त आहे. |

*व्याख्या*—**त्वमादिदेवः पुरुषः पुराणः**—आपण सर्व देवतांचे आदिदेव आहात, कारण सर्वात प्रथम आपणच प्रगट होत असता. आपण पुराणपुरुष आहात, कारण आपण सदा आहात आणि नित्यच राहणारे आहात.

**त्वमस्य विश्वस्य परं निधानम्**—पाहणे, ऐकणे, समजणे आणि जाणून घेणे यात जो काही संसार येत असतो आणि संसाराची उत्पत्ती, स्थिती, प्रलय इत्यादी जे काही होत असते, त्या सर्वांचे परम आधार आपण आहात.

* ह्याच अक्षर ब्रह्माला अर्जुनाने पूर्वी ''त्वमक्षरं परमं वेदितव्यम्'' (११।१८) पदाने आणि येथे ''त्वमक्षरम्'' पदाने म्हटले आहे.

**वेत्तासि**—आपण संपूर्ण संसाराला जाणणारे आहात, अर्थात् भूत, भविष्य आणि वर्तमानकाळ, तसेच देश, वस्तू, व्यक्ती इत्यादी जे काही आहेत त्या सर्वांना जाणणारे (सर्वज्ञ) आपणच आहात.

**वेद्यम्**—वेद, शास्त्र, संत महात्मा इत्यादीद्वारा जाणण्याला योग्य केवळ आपणच आहात.

**परं धाम**—ज्याला मुक्ती, परमपद इत्यादी नावाने म्हटले जाते, जेथे गेल्यानंतर पुन्हा परत यावे लागत नाही आणि ज्याला प्राप्त करून घेतल्यानंतर करणे जाणणे आणि प्राप्त करणे काहीही शिल्लक राहत नाही—असे परमधाम आपण आहात.

**अनन्तरूप**—विराटरूपाने प्रगट झालेल्या आपल्या रूपांचा काही अंत लागत नाही. सर्वच बाजूंनी आपली अनंत रूपे आहेत.

**त्वया ततं विश्वम्**—आपल्याने हा संपूर्ण संसार व्यापलेला आहे, अर्थात् संसाराच्या कणा-कणात आपणच व्यापलेले आहात.

**परिशिष्ट भाव**—अर्जुन भगवंताने सांगितलेलीच गोष्ट सांगत आहेत—'**आदिदेवः**'. हे भगवंताने '**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः**' (१०।२) त्या पदांनी म्हटले होते. जरी प्रकृतीही अनादी आहे—'**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि**' (१३।१९), तरी अनादी असूनही प्रकृती परमात्म्याच्या अधीन, आश्रित आहे. कारण प्रकृती परमात्म्याची परिवर्तनशील शक्ती आहे, परंतु परमात्मा कोणाची शक्ती नाहीत तर शक्तिमान् आहेत.

'**पुराणः**' याला भगवंताने '**पुराणम्**' (८।९) पदाने म्हटले होते. भगवंताहून पुरातन (पूर्वीचा) कोणी नाही कारण ते काळातीत आहेत.

'**परं निधानम्**'—याला भगवंताने '**निधानम्**' (९।१८) पदाने म्हटले होते. सृष्टी अनंत आहे परंतु तीही भगवंताच्या एका देशात राहते.

'**वेत्ता**'—याला भगवंताने '**वेदाहं समतीतानि०**' (७।२६) इत्यादी पदांनी म्हटले होते.

'**वेद्यम्**' याला भगवंताने '**वेद्यम्**' (९।१७), पदाने म्हटले होते.

'**परं धाम**'—याला भगवंताने '**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम**' (८।२१) पदांनी म्हटले होते.

'**त्वया ततं विश्वम्**'—याला भगवंताने '**येन सर्वमिदं ततम्**' (८।२२) आणि '**मया ततमिदं सर्वम्**' (९।४) पदांनी म्हटले होते.

## वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च।
## नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते॥ ३९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वम्** | = आपणच | **च** | = आणि | **नमः** | = नमस्कार असो! |
| **वायुः** | = वायू, | **प्रपितामहः** | = प्रपितामह (ब्रह्मदेवाचेही पिता) आहात. | **च** | = आणि |
| **यमः** | = यमराज, | | | **पुनः, अपि** | = पुन्हाही |
| **अग्निः** | = अग्नी, | **ते** | = आपणाला | **ते** | = आपणाला |
| **वरुणः** | = वरुण, | **सहस्रकृत्वः** | = हजारो वेळा | **भूयः** | = वारंवार |
| **शशाङ्कः** | = चंद्रमा, | **नमः** | = नमस्कार | **नमः** | = नमस्कार असो! |
| **प्रजापतिः** | = दक्ष इत्यादी प्रजापती | **अस्तु** | = असो! | **नमः** | = नमस्कार असो! |

*व्याख्या*—**वायुः**—ज्यामुळे सर्वांना प्राण मिळतो, सर्व प्राणी जिवंत राहतात, सर्वांना शक्ती मिळते, तो वायू आपणच आहात.

**यमः**—जे संयमनीपुरीचे अधिपती आहेत आणि संपूर्ण संसारावर ज्यांचे शासन चालते, ते यमराज आपणच आहात.

**अग्निः**—जो सर्वात राहून शक्ती देतो, प्रगट होऊन प्रकाश देतो आणि जठराग्नीच्या रूपात अन्न पचवितो, तो अग्नी आपणच आहात.

**वरुणः**—ज्याच्या करवी सर्वांना जीवन मिळते, त्या जलाचे अधिपती वरुण आपणच आहात.

**शशाङ्कः**—ज्यामुळे संपूर्ण औषधींचे, वनस्पतींचे पोषण होत असते, तो चंद्र आपणच आहात.

**प्रजापतिः**—प्रजेला उत्पन्न करणारे दक्ष इत्यादी प्रजापती आपणच आहात.

**प्रपितामहः**—पितामह ब्रह्मदेवालाही प्रगट करणारे असल्याने आपण प्रपितामह आहात.

**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते**—इंद्र इत्यादी जितक्या काही देवता आहेत, त्या सर्व

आपणच आहात. आपण अनंतस्वरूप आहात. आपली स्तुती मी काय करणार? आपला महिमा काय गाणार ? मी तर आपणाला सहस्रशः फक्त नमस्कारच करू शकतो, आणखी करूच काय शकतो?

काही तरी करण्याची जबाबदारी मनुष्यावर तोपर्यंतच राहत असते, जोपर्यंत आपल्या ठिकाणी करण्याचे बळ अर्थात् अभिमान राहत असतो. जेव्हा आपल्या ठिकाणी काहीही करण्याचे सामर्थ्य राहत नसते, तेव्हा करण्याची जबाबदारी मुळीच राहत नाही. मग तो केवळ नमस्कारच करत असतो, अर्थात् आपल्या स्वतःला संपूर्णपणे भगवंताला समर्पण करून टाकतो. त्यानंतर करणे-करविण्याचे सर्व काम शरण्याचेच (भगवंताचेच) राहत असते, शरणागताचे नव्हे.

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥ ४०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्व** | = हे सर्वस्वरूप! | **सर्वतः** | = सर्व बाजूंनी (दाही दिशांनी) | **त्वम्** | = आपण |
| **ते** | = आपणाला | **एव** | = ही | **सर्वम्** | = सर्वांना (एका देशात) |
| **पुरस्तात्** | = समोरुन (ही) | **नमः** | = नमस्कार | **समाप्नोषि** | = समेटले आहे |
| **नमः** | = नमस्कार असो | **अस्तु** | = असो | **ततः** | = म्हणून |
| **अथ** | = आणि | **अनन्तवीर्य** | = हे अनंतवीर्य!, | **सर्वः** | = सर्व काही |
| **पृष्ठतः** | = मागच्या बाजूने (ही नमस्कार असो!) | **अमित विक्रमः** | = आपला अमर्याद पराक्रम असलेले | **असि** | = (आपणच) आहात. |
| **ते** | = आपणाला | | | | |

*व्याख्या*—**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व**—अर्जुन भयभीत आहेत. मी काय बोलावे, हे त्यांना समजत नाही. म्हणून ते मागून, पुढून सर्व बाजूंनी अर्थात् दाही दिशांनी नमस्कारच नमस्कार करत आहेत.

**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वम्**—''**अनन्तवीर्य**'' म्हणण्याचे तात्पर्य, आपण तेज, बळ, इत्यादीनेही अनंत आहात आणि ''**अमितविक्रम**'' म्हणण्याचे तात्पर्य, आपले पराक्रमयुक्त संरक्षण इत्यादी कार्यही असीम आहे. अशा प्रकारे आपली शक्तीही अनंत आहे आणि पराक्रमही अनंत आहे.

**सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः**—आपण सर्वांना समावृत करून ठेवले आहे, अर्थात् संपूर्ण संसार आपल्या अंतर्गत आहे. संसाराचा कोणताही अंश असा नाही, जो आपल्या अंतर्गत नाही.

अर्जुन एक फार मोठी अलौकिक, विलक्षण गोष्ट पाहत आहेत की, भगवंत अनंत सृष्टीत परिपूर्ण, व्याप्त आहेत आणि अनंत सृष्टी भगवंताच्या कोण्या एका अंशात स्थित आहेत.

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या दिव्य विराटरूपाला पाहून अर्जुन म्हणाले की, आपण आपल्या तेजाने संसाराला संतप्त करीत आहात—'**स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्**' (११। १९) तर संतप्त करणारे आणि संतप्त होणारे—दोन्ही एकाच विराटरूपाची अंग आहेत. भगवंताच्या उग्ररूपाला पाहून तिन्ही लोक व्यथित (व्याकूळ) होत आहेत—'**लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्**' (११। २०) तर व्यथित होणारे त्रैलोक्यही भगवंताच्या विराटरूपाचे अंग आहे. भगवंताला पाहून देवता भयभीत होऊन त्यांचे गुणगान करीत आहेत—'**केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति**' (११। २१) आणि राक्षसलोक भयभीत होऊन दाही दिशांना पळत आहेत—'**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति**' (११। ३६) तर भयभीत होणारे देवता आणि राक्षस सुद्धा विराटरूपाचीच अंग आहेत. कारण हे देवता, राक्षस इत्यादी कुरुक्षेत्रात नव्हते तर भगवंताच्या विराटरूपातच अर्जुनाला दिसत होते.

ब्रह्मा, विष्णु, शंकर, रुद्र, आदित्य, वसु, साध्यगण, विश्वेदेव, अश्विनीकुमार, मरुद्गण, पितृगण, सर्प, गंधर्व, यक्ष, राक्षस, असुर, ऋषि-महर्षी, विद्धगण, वायू, यमराज, अग्री, वरुण, चंद्रमा, सूर्य इत्यादी आणि यांच्या व्यतिरिक्त भीष्म, द्रोण, कर्ण, जयद्रथ इत्यादी समस्त राजेलोक—ही सर्वच सर्व दिव्य विराटरूपाचीच अंग आहेत. एवढेच नव्हे अर्जुन, संजय, धृतराष्ट्र तसेच कौरव आणि पांडव सेनाही त्यात विराटरूपाची अंग आहेत—'**सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः**'

तात्पर्य, जड-चेतन, स्थावर-जंगमरूपाने जे काही पाहण्यात, ऐकण्यात, चिंतनात येत आहे, ते सर्व अविनाशी भगवान्च आहेत. याचा अनुभव करण्यासाठी साधकाने दृढतेने असे मानावे की, मला समजो अथवा न समजो, अनुभवात येवो अथवा

न येवो, स्वीकार होवो अथवा न होवो, परंतु ही गोष्ट सत्य आहे. जसे पाण्याच्या एका बिंदूत आणि समुद्रात एकच जलतत्त्व परिपूर्ण आहे तसेच लहानात लहान आणि मोठ्यात मोठ्या प्रत्येक वस्तूत एकच परमात्मतत्त्व परिपूर्ण आहे—असे मानून त्याने नित्य-निरंतर मनातल्या मनात सर्वांना नमस्कार करीत रहावे. त्याला वृक्ष, नदी, पर्वत, दगड, भिंत इत्यादी जे काहीही दिसले, त्यात आपल्या इष्ट भगवंताला पाहून त्याने प्रार्थना करावी की, 'हे नाथ! मला आपले प्रेम प्रदान करावे, हे प्रभो! आपणाला माझा नमस्कार असो.' असे करण्याने त्याला सर्व ठिकाणी भगवान् दिसू लागतील, कारण वास्तविक सर्व काही भगवान्च आहेत.

*संबंध—आता पुढील दोन श्लोकांत अर्जुन भगवंताला प्रार्थना करत क्षमा मागत आहेत.*

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि॥ ४१॥**
**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम्॥ ४२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तव** | = आपला | **हे, यादव** | = हे यादव! | | कुटुंबियांच्या समक्ष |
| **इदम्** | = हा | **हे, सखे** | = हे मित्र! | **यत्** | = (माझ्याद्वारा आपला) जो काही |
| **महिमानम्** | = महिमा | **इति** | = अशाप्रकारे | | |
| **अजानता** | = न जाणता | **यत्** | = जे काही | **असत्कृतः** | = तिरस्कार (अपमान) केला गेला |
| **सखा** | = 'माझे सखा आहेत' | **उक्तम्** | = म्हटले आहे | | |
| | | **च** | = आणि | | |
| **इति** | = असे | **अच्युत** | = हे अच्युत! | **असि** | = आहे |
| **मत्वा** | = समजून | **अवहासार्थम्** | = हास्य-विनोदात | **अप्रमेयम्** | = हे अप्रमेयस्वरूप! |
| **मया** | = मी | **विहारशय्यासन-** | = चालता-फिरता | **तत्** | = त्याबद्दल |
| **प्रमादात्** | = प्रमादाने | **भोजनेषु** | झोपता-जागता | **त्वाम्** | = आपल्याकडून |
| **वा** | = अथवा | | उठता-बसता | **अहम्** | = मी |
| **प्रणयेन, अपि** | = प्रेमानेही | | खाते-पितेवेळी | **क्षामये** | = क्षमा करवित आहे अर्थात् आपणाला क्षमा मागत आहे. |
| **प्रसभम्** | = हट्टपूर्वक (विचार न करता) | **एकः** | = एकटे असताना | | |
| | | **अथवा** | = अथवा | | |
| **हे, कृष्ण** | = हे कृष्ण! | **तत्समक्षम्** | = त्या मित्रांच्या, | | |

*व्याख्या*—[जेव्हा अर्जुन विराट् भगवंताचे अत्युग्ररूप पाहून भयभीत झाले तेव्हा भगवंताच्या कृष्णरूपाला विसरून गेले आणि विचारू लागले की, आपण उग्ररूप धारण करणारे कोण आहात ? परंतु जेव्हा त्यांना भगवान् श्रीकृष्णांची आठवण आली की, ते हेच आहेत; तेव्हा भगवंताच्या प्रभाव इत्यादीला पाहून त्यांच्याशी सखाभावाने वर्तन केलेल्या मागील व्यवहाराची आठवण येते आणि त्याविषयी भगवंताची क्षमा मागतात]

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति**—जी मोठी माणसे असतात श्रेष्ठ पुरुष असतात, त्यांना त्यांच्या प्रत्यक्ष नावाने हाक मारली जात नाही. त्यांच्या साठी "आपण", "महाराज" इत्यादी शब्दांचा प्रयोग केला जातो. परंतु मी आपणाला कधी 'हे कृष्णा' म्हटले, कधी 'हे यादवा' म्हटले आणि कधी 'हे सख्या' ही म्हटले. याचे कारण काय होते ? "**अजानता महिमानं तवेदम्**"* याचे कारण हे होते की, मी आपल्या महिमेला आणि स्वरूपाला जाणले नाही की, आपण असे विलक्षण आहात. आपल्या कोण्या एका अंशात अनंत कोटी ब्रह्मांड विद्यमान् आहेत. असे मी पूर्वी जाणत नव्हतो. आपल्या प्रभावाकडे माझी दृष्टी गेली नव्हती. मी कधी विचारही केला नाही की, आपण कोण आहात आणि कसे आहात?

जरी अर्जुन भगवंताच्या स्वरूपाला, महिमेला, प्रभावाला

* "महिमानं तव इदम्" यात आलेले "इदम्" पद "महिमानं" चे विशेषण नाही कारण "महिमानम्" पद पुल्लिंगात आले आहे आणि "इदम्" पद नपुंसकलिंगात आले आहे. म्हणून येथे "इदम्" चा अर्थ "स्वरूप" घेतला गेला आहे. या दृष्टीने "महिमानं तव इदम्" चा अर्थ आपला महिमा आणि स्वरूप, असा झाला.

पूर्वीही जाणत होते, म्हणूनच तर त्यांनी एक अक्षौहिणी सैन्य सोडून नि:शस्त्र भगवंताचा स्वीकार केला होता, तरीही भगवंताच्या शरीराच्या कोण्या एका अंशात अनंत कोटी ब्रह्मांडे यथावकाश स्थित आहेत—अशा प्रभावाचे, स्वरूपाचे, महिमेचे ज्ञान पूर्वी अर्जुनाला नव्हते. जेव्हा भगवंतांनी कृपा करून विश्वरूप दाखविले, तेव्हा त्याला पाहूनच अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या प्रभावाकडे गेली आणि त्यांना भगवंताच्या प्रभावाची थोडी जाणीव झाली. त्यांचा असा विचित्र भाव झाला की, "कुठे मी व कुठे हे देवाधिदेव, परंतु मी हट्ट करून प्रमादाने अथवा प्रेमाने काही विचार न करता, जसे मनात आले तसे म्हटले—"**मया प्रमादात्प्रणयेन वापि**", बोलण्यात मी बिल्कुल सावधानी ठेवली नाही.

वास्तविक भगवंताचे माहात्म्य कोणीच जाणू शकत नाही, कारण त्यांचा महिमा अनंत आहे. जर ते माहात्म्य संपूर्णपणे जाणण्यात आले तर त्याची अनंतता राहणार नाही, ते सीमित होईल. जर भगवंताच्या सामर्थ्याने उत्पन्न होणाऱ्या विभूतींचाच अंत लागत नाही; तर भगवंत आणि त्यांच्या महिमेचा अंत कसा लागू शकेल ? अर्थात् लागूच शकत नाही.

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु**—मी आपल्याला बरोबरीचा सामान्य मित्र समजून हास्य-विनोद करताना, रस्त्याने चालता फिरताना, शय्येवर झोपता-जागताना, आसनावर बसता उठताना, भोजन करताना, जे काही अपमानकारक शब्द उच्चारले, आपला तिरस्कार केला, अथवा हे अच्युत!, आपण एकटे असताना अथवा त्या मित्रांच्या, कुटुंबियांच्या, सभ्य व्यक्तींच्या समोर माझ्याकरवी आपला जो तिरस्कार केला गेला आहे, तो सर्व मी आपल्याकडून क्षमा करवू इच्छितो. "**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम्**".

अर्जुन आणि भगवंताच्या मित्रतेचे असे वर्णन मिळते की, जसे दोन मित्र आपसात खेळत असतात, तसेच अर्जुन भगवंताबरोबर खेळत होते. कधी स्नान करताना परस्पर एक-मेकांच्या अंगावर पाणी उडवीत असत. कधी अर्जुन भगवंताच्या मागे धावत असत तर कधी भगवंत अर्जुनाच्या मागे धावत असत. कधी दोघेही हास्य विनोद करून हसत आणि हसवीत असत. कधी दोघेही आपापल्या विशेष कला दाखवीत असत. कधी भगवान् झोपले तर अर्जुन म्हणत—"तुम्ही इतके ऐसपैस झोपलात, इतरांना झोपायचे नाही काय ? तुम्ही एकटेच आहात काय ?" कधी आसनावर बसले तर अर्जुन म्हणत—"आसनावर तुम्ही एकटेच बसणार काय ? जरा पुढे सरकून बसा. दुसऱ्याला बसू द्याल की नाही ? तुम्ही एकटेच अधिकार गाजवू लागलात." अशा प्रकारे अर्जुन भगवंताशी फारच घनिष्ठतेचा व्यवहार करत होते.* आता अर्जुन त्या गोष्टींची आठवण करून म्हणतात की, हे भगवंत! "मी आपला न जाणो किती तरी तिरस्कार केला असेल मला तर ते आठवतही नाही. जरी आपण माझ्या ह्या अपराधाकडे लक्ष दिले नाही तरी, माझ्याकरवी आपला पुष्कळ तिरस्कार झाला आहे. म्हणून अप्रमेयस्वरूपी असलेल्या आपण माझ्या त्या सर्व अपराधांची क्षमा करावी." भगवंताला "अप्रमेय" म्हणण्याचे तात्पर्य, दिव्यदृष्टी असली तरीही त्या दिव्यदृष्टीच्या अंतर्गत आपण येत नाहीत.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाचा भगवंताशी सखा भाव होता परंतु भगवंताचे ऐश्वर्य पहिल्यामुळे ते आपला सखा भाव विसरून जातात आणि भगवंताला पाहून आश्चर्यचकित होतात, भयभीत होतात! त्यांच्या मनात अशी कल्पनाही नव्हती की, भगवान् असे आहेत!

***संबंध**—आता पुढील दोन श्लोकांत अर्जुन भगवंताची महत्ता आणि प्रभावाचे वर्णन करून पुन्हा क्षमा करण्यासाठी प्रार्थना करतात.*

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव॥ ४३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वम्** | = आपण (च) | **पिता** | = पिता | **च** | = आणि |
| **अस्य** | = या | **असि** | = आहात, | **गरीयान्** | = (आपणच) गुरूंचे |
| **चराचरस्य** | = चराचर | **पूज्यः** | = (आपणच) पूजनीय आहात | **गुरुः** | = श्रेष्ठ गुरू आहात. |
| **लोकस्य** | = संसाराचे | | | **अप्रतिम-** | = हे अनंत प्रभाव- |

* शय्यासनाटनविकत्थनभोजनादिष्वैक्याद् वयस्य ऋतवानिति विप्रलब्धः। सख्युः सखेव पितृवत्तनयस्य सर्वं सेहे महान् महितया कुमतेरघं मे॥ (श्रीमद्भा० १।१५।१९)

अर्जुन म्हणतात—भगवान् श्रीकृष्णाबरोबर झोपणे, बसणे, फिरणे, गप्पा गोष्टी करणे आणि भोजनादिक करणे, अशा सर्व वेळी माझा व त्यांचा असा सहज स्वभाव झाला होता की, मी कधी कधी "हे मित्रा आपण फारच खरे बोलणारे आहात!" असे म्हणून आक्षेपही घेत होतो. परंतु ते महात्मा प्रभू आपल्या मोठेपणानुसार माझे कुबुद्धीचे सर्व तिरस्कार, मित्र जसे मित्राचे व पिता जसे पुत्राचे तिरस्कार सहन करतो, तसेच सहन करावयाचे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रभाव** | शाली भगवन्! | | सारखेही | | आपल्यापेक्षा |
| **लोकत्रये** | = या त्रैलोक्यात | **अन्यः** | = दुसरे कोणी | **अभ्यधिकः** | = अधिक |
| **त्वत्समः, अपि,** | = आपल्या | **न, अस्ति** | = नाही (तर मग) | **कुतः** | = कसे असू शकते! |

*व्याख्या*—**पितासि लोकस्य चराचरस्य**—अनंत ब्रह्मांडांमध्ये मनुष्य, पशू, पक्षी इत्यादी जितके जंगम प्राणी आहेत आणि वृक्ष, लता इत्यादी स्थावर प्राणी आहेत त्या सर्वांना उत्पन्न करणारे आणि त्यांचे पालन करणारे पिताही आपण आहात, त्यांचे पूजनीयही आपण आहात, तसेच त्यांना बोध देणारे श्रेष्ठ गुरूही आपणच आहात—"**त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्.**"

**गुरुर्गरीयान्**—याचे तात्पर्य, संपूर्ण मनुष्यांना व्यवहार आणि परमार्थात जेथे-कोठेही गुरुजनांकडून उपदेश मिळतो. त्या उपदेश देणाऱ्या गुरुजनांचेही श्रेष्ठ गुरू आपणच आहात. अर्थात् उपदेश, बोध आणि ज्ञानाचे उद्‌गम स्थान आपणच आहात.

**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोन्यो लोकत्रयेऽप्य-प्रतिमप्रभाव**—या त्रैलोक्यात जर आपल्यासारखाच कोणी नाही, कोणी होणार नाही आणि कोणी होऊच शकत नाही तर मग आपल्यापेक्षा अधिक विलक्षण कोणी कसा असू शकतो? म्हणून आपला प्रभाव अतुलनीय आहे. त्याची तुलना कोणाबरोबरही केली जाऊ शकत नाही.

**परिशिष्ट भाव**—अर्जुन लौकिक दृष्टीने, संसाराच्या सत्तेच्या अनुषंगाने म्हणत आहेत की, या त्रैलोक्यात आपल्या सारखेही दुसरे कोणीही नाही तर मग आपल्यापेक्षा अधिक कसे असू शकते! परंतु वास्तविक दृष्टीने जर भगवंताशिवाय दुसरे कोणी नाहीच तर मग सारखे आणि अधिक म्हणणे संभवतच नाही.

## तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।
## पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्॥ ४४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून | **प्रसादये** | = प्रसन्न करू इच्छितो. | **प्रियाय** | = पत्नीचा (अपमान सहन करतो) |
| **ईड्यम्** | = स्तुती करण्यायोग्य | **इव** | = जसा | | |
| **त्वाम्** | = आपणा- | **पिता** | = पिता | **देव** | = (तसेच) हे देव! (आपण माझ्याकडून केला गेलेला अपमान) |
| **ईशम्** | = ईश्वराला | **पुत्रस्य** | = पुत्राचा, | | |
| **अहम्** | = मी | **इव** | = जसा | | |
| **कायम्** | = शरीराने | **सखा** | = मित्र | **सोढुम्** | = सहन करण्यात अर्थात् क्षमा करण्यात |
| **प्रणिधाय** | = दंडवत | **सख्युः** | = मित्राचा (आणि) | | |
| **प्रणम्य** | = प्रणाम करून | **प्रियः** | = पती (जसा) | **अर्हसि** | = समर्थ आहात. |

*व्याख्या*—**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्**—आपण अनंत ब्रह्मांडाचे ईश्वर आहात. म्हणून सर्वांनी स्तुती करण्यास योग्य आपणच आहात. आपले गुण, प्रभाव, महत्त्व इत्यादी अनंत आहेत. म्हणून ऋषी, महर्षी, देवता, महापुरुष आपली नित्य-निरंतर स्तुती करत असतात, तरीही त्यांना पार लागू शकत नाही. अशा स्तुती करण्याला योग्य असलेल्या आपली, मी काय स्तुती करू शकतो? माझ्यात आपली स्तुती करण्याची शक्ती नाही, सामर्थ्य नाही. म्हणून मी केवळ साष्टांग दंडवत प्रणामच करू शकतो आणि त्याद्वाराच आपणास प्रसन्न करू इच्छितो.

**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्**—एखाद्याचा अपमान होत असेल तर त्यात मुख्य तीन कारण असतात-(१) प्रमादाने (असावधानीने), (२) हास्य-विनोदात लक्ष न राहिल्याने आणि (३) आपलेपणाची घनिष्टता झाल्याने, आपल्याबरोबर राहणाऱ्याचे महत्त्व न समजल्याने! जसे मांडीवर बसलेला लहान बालक अज्ञानाने पित्याच्या दाढी-मिशा ओढतो, तोंडावर थाप मारतो, कधी कुठे लाथ मारतो, त्यावेळी त्या बालकाच्या ह्या क्रियांनी पिता खूश होतो, प्रसन्न होतो. त्या वेळी पिता हा भाव मनात आणितच नाही की, पुत्र माझा अपमान करत आहे. मित्र मित्राशी चालता-फिरताना, उठता-बसताना इत्यादी वेळी वाटेल तसा व्यवहार करतो, वाटेल तसा बोलत असतो, जसे "तुम्ही फार सत्य बोलता, तुम्ही तर

फार सत्य प्रतिज्ञ झाला आहात, आता तर तुम्ही फार मोठे झाला आहात, तुम्ही तर खूपच अभिमानी झाला आहात, जणू काय तुम्ही राजे झालात की काय! इत्यादी. परंतु त्याचा मित्र या बोलाकडे लक्ष देत नाही. तो असेच समजतो की, आपण तर बरोबरीचे मित्र आहोत. असा हास्य-विनोद तर होतच राहणार. पत्नीकडून आपसातल्या प्रीतीमुळे उठण्या-बसण्यात, बोलाचालीत पतीची जी अवहेलना होत असते, त्याला पती सहन करत असतो. जसे पती खाली बसला आहे आणि पत्नी उच्चासनावर बसली असेल, कधी कोणत्या गोष्टीवरुन अवहेलना केली तरी अशा वेळी पती फारसे मनावर न घेता सहन करत असतो. अर्जुन म्हणतात की, जसे पिता पुत्राचे, मित्र मित्राचे आणि पती पत्नीचे अपराध सहन करत असतो अर्थात् क्षमा करत असतो; तसेच हे भगवंत! आपण माझ्या अपराधाला सहन करण्यास समर्थ आहात; अर्थात् त्यासाठी मी आपल्याकडे क्षमेची याचना करत आहे.

एक्केचाळीसाव्या-बेचाळीसाव्या श्लोकात अर्जुनाने तीन गोष्टी म्हटल्या होत्या. "**प्रमादात्**" (प्रमादाने), "**अवहासार्थम्**" (हास्य-विनोदात) आणि "**प्रणयेन**" (प्रीतीने). त्याच तीन गोष्टींचा संकेत अर्जुनाने येथे तीन दृष्टांत देऊन केला आहे; अर्थात् प्रमादासाठी पिता-पुत्राचा, हास्य-विनोदासाठी मित्र-मित्राचा आणि प्रीतीसाठी पति-पत्नीचा दृष्टांत दिला आहे.

**अकराव्या अध्यायात अकरा रसांचे वर्णन**—या अध्यायात अकरा रसांचे वर्णन अशा प्रकारे आले आहे. देवरूपाचे वर्णन झाल्याने "शांतरस" (११।१५-१८), स्वर्गापासून पृथ्वीपर्यंत आणि दाही दिशात व्यापून असलेल्या विराटरूपाच्या वर्णनाने "अद्भुतरस" (११।२०), आपल्या जिभेने सर्वांचा घास करत आहेत आणि सर्वांचा संहार करण्यासाठी काळरूपाने प्रवृत्त झाले आहेत—असे रौद्ररूप धारण केल्याने "रौद्ररस" (११।३०-३२), भयंकर विकराळ मुख आणि दाढा असणारे रूप असल्याने "बीभत्सरस" (११।२३-२५), तू युद्धासाठी सज्ज हो या रूपात "वीररस" (११।३३), साष्टांग दंडवत प्रणाम करण्याने "दास्य रस" (११।४४ चा पूर्वार्ध), मुख्य मुख्य योद्ध्यांना तसेच इतर राजेलोकांना भगवंताच्या मुखात जाताना पाहण्याने "करुण-रस" (११।२८-२९), दृष्टांताने मित्र-मित्राचे, पिता-पुत्राचे आणि पती-पत्नीचे अपराध सहन करतो—या रूपात क्रमाने "सख्यरस," "वात्सल्यरस," आणि "माधुर्यरस" याचे वर्णन झाले. (११।४४ चा उत्तरार्ध) आणि हास्य-विनोदाच्या स्मृतिरूपाने "हास्यरसाचे" वर्णन झाले आहे (११।४२ चा पूर्वार्ध)

***संबंध**—आता पुढील दोन श्लोकांत अर्जुन चतुर्भुजरूप दाखविण्याची प्रार्थना करतात.*

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे।**
**तदेव मे दर्शय देवरूपं प्रसीद देवेश जगन्निवास॥ ४५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अदृष्टपूर्वम्** | = जे पूर्वी कधीच पाहिले नव्हते, ते रूप | **मे** | = माझे | **देवरूपम्** | = देवरूप (शांत विष्णुरूप) |
| **दृष्ट्वा** | = पाहून (मी) | **मनः** | = मन | **दर्शय** | = दाखवावे. |
| **हृषितः** | = हर्षित | **प्रव्यथितम्** | = अत्यंत व्यथित होत आहे (म्हणून आपण) | **देवेश** | = हे देवेश! |
| **अस्मि** | = होत आहे | | | **जगन्निवास** | = हे जगन्निवास! |
| **च** | = आणि (त्याबरोबरच) | **मे** | = मला (आपले) | **प्रसीद** | = (आपण) प्रसन्न व्हावे. |
| **भयेन** | = भीतीने | **तत्, एव** | = तेच | | |

***व्याख्या**—* [जसे विराटरूप दाखविण्यासाठी मी भगवंताला प्रार्थना केली तर भगवंतांनी मला विराटरूप दाखविले, तसेच देवरूप, दाखविण्यासाठी प्रार्थना केली तर, भगवंत देवरूप दाखवितीलच, अशी आशा असल्याने अर्जुन भगवंताना देवरूप दाखविण्यासाठी प्रार्थना करतात.]

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे**—मी आपले असे अलौकिक, आश्चर्यकारक, विशालरूप पूर्वी कधी पाहिले नव्हते. आपले असे रूप असेल अशी माझ्या मनात कधी कल्पनासुद्धा नव्हती. असे रूप पाहण्याची माझ्या ठिकाणी काही योग्यताही नव्हती. हे तर केवळ आपण आपल्याकडूनच कृपा करून दाखविले आहे. त्यामुळे मी आपल्याला भाग्यवान समजून हर्षित होत आहे. आपल्या कृपेला पाहून गद्‌गद होत आहे. परंतु त्या-बरोबरच आपल्या स्वरूपाच्या उग्रतेला पाहून माझे मन

भयाने अत्यंत व्यथित होत आहे, व्याकूळ होत आहे, मी फार घाबरून गेलो आहे.

**तदेव मे दर्शय देवरूपम्— तत्** (ते) शब्द परोक्षवाची आहे. म्हणून "**तदेव**" (**तत् एव**) म्हणण्याचा असा आशय दिसतो की, अर्जुनाने देवरूप (विष्णुरूप) पूर्वी कधी पाहिले आहे, जे आता समोर नाही. विश्वरूप पाहताना जेथे अर्जुनाची दृष्टी प्रथम गेली तेथे त्यांनी कमलासनावर विद्यमान असलेल्या ब्रह्मदेवाला पाहिले. "**पश्यामि देवांस्तव देव देहे—ब्रह्माणमीशं कमलासनस्थम्**" (११।१५). यावरुन सिद्ध होते की, ते कमल ज्याच्या नाभीपासून निघाले आहे, त्या शेषशायी चतुर्भुज विष्णू रूपालाही अर्जुनाने पाहिले आहे. त्यानंतर सतराव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले आहे की, मी आपणाला किरीट, गदा, चक्र (आणि च पदाने शंख आणि पद्म) धारण केलेले पाहत आहे—"**किरीटिनं गदिनं, चक्रिणं च**" या दोन्ही गोष्टीवरुन हे सिद्ध होते की, अर्जुनांनी विश्वरूपाच्या अंतर्गत भगवंताच्या ज्या विष्णुरूपाला पाहिले होते, त्यासाठीच अर्जुन येथे "तेच देवरूप मला दाखवा" असे म्हणत आहेत.*

**देवरूपम्**—म्हणण्याचे तात्पर्य, मी विराटरूपात आपल्या विष्णुरूपालाही पाहिले होते परंतु आता आपण मला केवळ विष्णुरूपच दाखवा. दुसरी गोष्ट पंधराव्या श्लोकातही अर्जुनाने भगवंतासाठी "देव" म्हटले आहे—"**पश्यामि देवांस्तव देव देहे**" आणि या ठिकाणीही देवरूप दाखविण्यासाठी म्हणत आहेत. याचे तात्पर्य, विराटरूपही नको आणि मनुष्यरूपही नको, केवळ देवरूप दाखवा. पुढील (सेहेचाळीसाव्या) श्लोकातही "**तेनैव**" पदाने विराटरूप आणि मनुष्यरूपाचा निषेध करून भगवंताना चतुर्भुज विष्णुरूप बनण्याची प्रार्थना करीत आहेत.

**प्रसीद देवेश जगन्निवास**—येथे "जगन्निवास" संबोधन विश्वरूपाचे आणि "देवेश" संबोधन चतुर्भुजरूपाचे संकेत करत आहे. अर्जुन हे दोन संबोधन देऊन जणू हे म्हणत आहेत की, संपूर्ण संसाराचा निवास आपल्या ठिकाणी आहे—असे विश्वरूप तर मी पाहिले आहे आणि पाहत आहे. आता आपण "देवेश" देवतांचे स्वामी विष्णरूप व्हा.

## विशेष गोष्ट

भगवंताचे विश्वरूप दिव्य आहे, अविनाशी आहे, अक्षय आहे. या विश्वरूपात अनंत ब्रह्मांड आहेत, तसेच त्या ब्रह्मांडांची उत्पत्ती, स्थिती आणि प्रलय करणारे ब्रह्मा, विष्णू आणि शिवही अनंत आहेत. या नित्य विश्वरूपापासून अनंत विश्व (ब्रह्मांड) उत्पन्न होऊन त्यात लीन होत राहतात. परंतु हे विश्वरूप अव्यय असल्याने जसेच्या तसे राहत असते. हे विश्वरूप इतके दिव्य, अलौकिक आहे की, हजारो भौतिक सूर्याचा प्रकाशसुद्धा याच्या प्रकाशाची बरोबरी करू शकत नाही. (११।१२) म्हणून या विश्वरूपाला "दिव्यचक्षू" शिवाय कोणीही पाहू शकत नाही. "ज्ञानचक्षू" द्वारा संसाराच्या मुळात सत्तारूपाने जे परमात्मतत्त्व आहे त्याचा बोध होतो आणि "भावचक्षू" ने संसार भगवत्स्वरूप दिसतो. परंतु या दोन्हीही चक्षूंनी विश्वरूपाचे दर्शन होत नाही. "चर्मचक्षू" ने तत्त्वाचा बोधही होत नाही आणि संसार भगवत्स्वरूपही दिसत नाही व विश्वरूपाचे दर्शनही होत नाही कारण चर्मचक्षू प्रकृतीचे कार्य आहे. म्हणून चर्मचक्षूंनी प्रकृतीच्या स्थूल कार्यालाच पाहिले जाऊ शकते.

वास्तविक भगवंताची द्विभुज, चतुर्भुज, सहस्रभुज इत्यादी जितकी काही रूपे आहेत ती सर्वच्या सर्व दिव्य आणि अव्यय आहेत. त्याचप्रमाणे भगवंताचे सगुण-निराकार, निर्गुण-निराकार, सगुण-साकार इत्यादी जितकी काही रूपे आहेत, ती सर्वच्या सर्व दिव्य आणि अव्यय आहेत.

माधुर्य लीलेत तर भगवान् द्विभुजरूपच राहतात. परंतु जेथे आपले काही ऐश्वर्य दाखविण्याची आवश्यकता असते तेथे भगवान् पात्र, अधिकार, भाव इत्यादीच्या भेदाने आपले विराटरूपच दाखवितात. जसे, भगवंतानी अर्जुनाला मनुष्य-रूपात प्रगट असलेल्या आपल्या द्विभुजरूप शरीराच्या कोण्या एका अंशात विराटरूप दाखविले आहे.

भगवंताचे ठिकाणी अनंत-असीम ऐश्वर्य, माधुर्य, सौंदर्य, औदार्य इत्यादी दिव्य गुण आहेत. त्या अनंत दिव्य गुणांसह भगवंताचे विश्वरूप आहे. भगवान् ज्या कोणाला असे विश्वरूप दाखवितात, त्याला आगोदर दिव्यदृष्टी देतात. दिव्यदृष्टी दिली तरी तो ज्या पात्रतेचा असेल, जशी योग्यता असेल, जशी रुची असेल; त्यानुसार भगवान् त्याला आपल्या विश्वरूपाच्या स्तरांचे दर्शन करवितात. येथे अकराव्या अध्यायाच्या पंधराव्यापासून तीसाव्या श्लोका-पर्यंत भगवंत विश्वरूपात अनेक स्तरांनी प्रगट होत गेले. ज्यात प्रथम देवरूपाची (११।१५-१८) नंतर उग्ररूपाची (११।१९-२२) आणि त्यानंतर अत्युग्ररूपाची (११।२३-३०) प्रधानता राहिली. अत्युग्ररूप पाहून जेव्हा अर्जुन भयभीत झाले, तेव्हा भगवंतांनी आपल्या दिव्यातिदिव्य

* पुढे एकोणपन्नासाव्या श्लोकात "पुन:" तसेच "तदेव" पदाने भगवंतांनी आणि पन्नासाव्या श्लोकात "भूय:" पदाने संजयानेही त्याच (विश्वरूपाच्या अंतर्गत पाहिलेले) चतुर्भुज रूपाला दाखविण्याची गोष्ट म्हटली आहे.

विश्वरूपाच्या स्तरांना दाखवणे बंद केले. अर्थात् अर्जुन भयभीत झाल्यामुळे भगवंतांनी पुढील रूपांचे दर्शन करविले नाही. तात्पर्य, भगवंतांनी दिव्य विराटरूपाच्या अनंत स्तरां-पैकी तितकेच स्तर अर्जुनाला दाखविले, जितक्या स्तरांना दाखविण्याची आवश्यकता होती आणि जितक्या स्तरांना पाहण्याची अर्जुनाचे ठिकाणी योग्यता होती.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव।**
**तेनैव* रूपेण चतुर्भुजेन सहस्त्रबाहो भव विश्वमूर्ते॥ ४६ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहम्** | = मी | **चक्रहस्तम्** | = हातात चक्र घेतलेले (अर्थात् चतुर्भुजरूपाने) | **विश्वमूर्ते** | = हे विश्वमूर्ते! (आपण) |
| **त्वाम्** | = आपणास | | | **तेन, एव** | = तेच |
| **तथा, एव** | = तसेच | | | **चतुर्भुजेन, रूपेण** | = चतुर्भुजरूप (शंख-चक्र-गदा-पद्मसहित) |
| **किरीटिनम्** | = किरीटधारी, (मुकुटधारी) | **द्रष्टुम्** | = पाहू | | |
| | | **इच्छामि** | = इच्छितो (म्हणून) | | |
| **गदिनम्** | = गदाधारी (आणि) | **सहस्त्रबाहो** | = हे सहस्त्रबाहो! | **भव** | = धारण करावे. |

*व्याख्या*— **किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव**—आपल्या डोक्यावर दिव्य मुकुट व हातात गदा व चक्र धारण केले आहे, असे आपले रूप मी पाहू इच्छितो

**तथैव**—म्हणण्याचे तात्पर्य, मी "**द्रष्टुमिच्छामि ते रूपम्**" (११।३) अशी इच्छा प्रगट केल्यामुळे आपण विराटरूप दाखविले. आता मी आपली इच्छा अपूर्ण का ठेवू? म्हणून मी आपल्या विराटरूपात जसे सौम्य चतुर्भुज पाहिले आहे, तसेच रूप मी आता पाहू इच्छितो "**इच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव**"

**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्त्रबाहो भव विश्वमूर्ते**— पंधराव्या आणि सतराव्या श्लोकांत ज्या विराटरूपात चतुर्भुज विष्णुरूप पाहिले होते, त्या विराटरूपाचा निषेध करण्यासाठी अर्जुन येथे "**एव**" पद देतात. तात्पर्य, "**तेन चतुर्भुजेन रूपेण**" हे पद तर चतुर्भुजरूप दाखविण्यासाठी आले आहेत आणि "**एव**" पद "विराटरूपाबरोबर नको" असा निषेध करण्यासाठी आले आहे तसेच "**भव**" पद "व्हा" अशा प्रार्थनेसाठी आले आहे.

पूर्व श्लोकात "**तदेव**" तसेच येथे "**तथैव**" आणि "**तेनैव**" तिन्ही पदांचे तात्पर्य, अर्जुन विश्वरूपाला फारच भ्याले होते. म्हणून तीन वेळ "**एव**" पदाचा प्रयोग करून भगवंताला म्हणतात की, मी आपले केवळ विष्णुरूपच पाहू इच्छितो. विष्णुरूपाबरोबर विश्वरूप नको. म्हणून आपण केवळ चतुर्भुजरूपाने प्रगट व्हा.

**सहस्त्रबाहो**—या संबोधनाचा भाव असा वाटतो की, हे हजारो हात असणाऱ्या भगवंता, आपण चार हात असणारे व्हा आणि "**विश्वमूर्ते**" या संबोधनाचा भाव असा वाटतो की, हे अनेक रूप धारण करणाऱ्या भगवंता आपण एक रूपधारी व्हा. तात्पर्य, विश्वरूपाचा संहार करून चतुर्भुज विष्णुरूप व्हा.

**परिशिष्ट भाव**—जरी मूळ श्लोकात भगवंताचे गदा आणि चक्र धारण केलेले रूप वर्णन केले आहे तरी '**चतुर्भुजेन**' पद आल्यामुळे येथे चारी हातात गदा आणि चक्र यांच्याबरोबर शंख आणि पद्म देखील आहेत असे समजावे.

***संबंध***—*एकतीसाव्या श्लोकात अर्जुनाने विचारले होते की, उग्ररूप धारण करणारे आपण कोण आहात. त्यावेळी भगवंतांनी उत्तर दिले की, मी काळ आहे आणि सर्वांचा नाश करण्यासाठी प्रवृत्त झालो आहे. असे ऐकून तसेच विकराळ रूपाला पाहून अर्जुनाला असे वाटले की, भगवंत फारच रागावले आहेत. म्हणून अर्जुन भगवंताना प्रसन्न करण्यासाठी वारंवार प्रार्थना करत आहेत. अर्जुनाच्या या भावनेला दूर करण्यासाठी भगवान् म्हणतात.*

---

* इदमस्तु सन्निकृष्टे समीपतरवर्ति चैतदो रुपम्। अदसस्तु विप्रकृष्टे तदिति परोक्षे विजानीयात्॥

त्या उक्तिनुसार "इदम्" शब्द जवळचा, "एतत्" शब्द अत्यंत जवळचा, "अदस्" शब्द दूरचा आणि "तत्" शब्द परोक्षवाचक आहे. विश्वरूपात या सर्वांचा प्रयोग झाला आहे. जसे विश्वरूप जवळ असल्यामुळे अर्जुनाने अठराव्या, एकोणीसाव्या इत्यादी श्लोकात "इदम्" शब्दाचा, भीष्माचार्य, द्रोणाचार्य, इत्यादी विराटरूप भगवंताच्या अत्यंत जवळ असल्याने अर्थात् विराटरूपाचेच अंग असल्याने भगवंतांनी तेहतीसाव्या श्लोकात "एतत्" शब्दाचा, भगवंतांनी दिलेल्या दिव्यदृष्टीने विराटरूप पुष्कळ दुरवर दिसत होते आणि त्यात देवता इत्यादीही दूरवर दिसत होत्या. म्हणून अर्जुनाने एकेवीसाव्या, सव्वीसाव्या आणि अठ्ठावीसाव्या श्लोकात "अदस्" शब्दाचा आणि विराटरूपाच्या प्रथम स्तरात पाहिलेले चतुर्भुज विष्णुरूप (विराटरूपाचे स्तर बदलल्यामुळे) डोळ्यासमोर नसल्याने अर्थात् परोक्ष असल्याने अर्जुनाने "तत्" शब्दाचा प्रयोग केला आहे.

*श्रीभगवानुवाच*

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्॥ ४७॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **परम्** | = अत्यंत श्रेष्ठ, | **दर्शितम्** | = दाखविले आहे, |
| **मया** | = मी | **तेजोमयम्** | = तेजस्वरूप, | **यत्** | = जे |
| **प्रसन्नेन** | = प्रसन्न होऊन | **आद्यम्** | = सर्वांचे आदि (आणि) | **त्वदन्येन** | = तुझ्याशिवाय |
| **आत्मयोगात्** | = स्वतःच्या सामर्थ्याने | **अनन्तम्** | = अनंत | **दृष्टपूर्वम्** | = पूर्वी कोणीही पाहिलेले |
| **मे** | = माझे | **विश्वम्, रूपम्** | = विश्वरूप | | |
| **इदम्** | = हे | **तव** | = तुला | **न** | = नाही |

*व्याख्या*— **मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं दर्शितम्**— हे अर्जुन! तू वारंवार आपण प्रसन्न व्हा म्हणून म्हणत आहेस (११।२५,३१,४५) तर हे प्रिय सखा! मी जे तुला विराटरूप दाखविले आहे, त्यातील विक्राळरूपाला पाहून तू भयतीत झाला आहेस, परंतु हे विक्राळरूप मी क्रोधाने किंवा तुला भयभीत करण्यासाठी दाखविले नव्हते. मी तर आपल्या स्वतः च्या प्रसन्नतेनेच हे विराटरूप तुला दाखविले आहे. यात तुझी कोणती योग्यता, पात्रता अथवा भक्ती कारण नव्हे. तू तर पूर्वी केवळ विभूती आणि योगालाच विचारले होते. विभूती आणि योगाचे वर्णन करून मी शेवटी म्हटले होते की, तुला जेथे-कोठे जी काही विलक्षणता दिसेल, तेथे तेथे माझीच विभूती आहे असे समज. अशा प्रकारे तुझ्या प्रश्नाचे उत्तर सम्यक् प्रकाराने मी दिले होते. परंतु तेथे मी ("**अथवा**" पदाने) आपल्याकडूनच ही गोष्ट म्हटली होती की, तुला अधिक जाणून घेण्याची काय गरज आहे ? कारण सर्व विभूती माझ्या योगशक्तीच्या आश्रित आहेत आणि योगशक्तीचा आश्रय असलेला मी स्वतः तुझ्यासमोर बसलेला आहे. ही गोष्ट तर मी विशेष कृपा करूनच सांगितली होती. हे ऐकूनच तुला विश्वरूप पाहण्याची इच्छा झाली आणि मी तुला दिव्यदृष्टी देऊन विश्वरूप दाखविले. ही तर माझी सर्व केवळ प्रसन्नताच आहे. तात्पर्य, हे विश्वरूप दाखविण्यात माझ्या कृपेशिवाय दुसरा कोणताच हेतू नव्हे. तुझी पाहण्याची इच्छा तर निमित्तमात्र आहे.

**आत्मयोगात्**—हे विराटरूप दाखविण्यात मी कोणाचीही मदत घेतली नाही, तर केवळ स्वतः च्या सामर्थ्यानेच तुला हे रूप दाखविले आहे.

**परम्**—माझे हे विराटरूप अत्यंत श्रेष्ठ आहे.

**तेजोमयम्**—हे माझे विश्वरूप अत्यंत तेजोमय आहे. म्हणून दिव्यदृष्टी मिळूनही तू या रूपाला दुर्निरीक्ष्य म्हटले आहेस (११।१७)

**विश्वम्**—या रूपाला तू स्वतः विश्वरूप, विश्वमूर्ते इत्यादी नावाने संबोधित केले आहेस. माझे हे रूप सर्वव्यापी आहे.

**अनन्तमाद्यम्**—माझ्या या रूपाचा देश, काळ इत्यादीच्या दृष्टीने आदिही नाही किंवा अंतही नाही. हे सर्वांचे आदि आहे आणि स्वतः अनादी आहे.

**यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्**—तुझ्याशिवाय माझ्या विश्वरूपाला पूर्वी कोणीही पाहिलेले नाही—ही गोष्ट भगवंतांनी कशी म्हटली? कारण रामावतारात माता कौसल्याने आणि कृष्ण अवतारात माता यशोदेने तसेच कौरवसभेत भीष्म, द्रोण, संजय, विदुर आणि ऋषी-मुनींनी भगवंताचे विराटरूप पाहिलेलेच होते. याचे उत्तर भगवंतांनी आपल्या विराटरूपासाठी "**एवंरूपः**" (११।४८) पद देऊन म्हटले आहे की, अशा प्रकारच्या भयंकर विश्वरूपाला, ज्याच्या मुखात मोठ-मोठे योद्धे, सेनापती इत्यादी जात आहेत, पूर्वी कोणीही पाहिले नाही.

दुसरी गोष्ट, अर्जुनासमोर युद्धाचा प्रसंग असल्याने असे भयंकर विश्वरूप दाखविण्याचीच आवश्यकता होती शूरवीर अर्जुनच अशा रूपाला पाहू शकत होते. परंतु माता कौसल्या इत्यादीच्या समोर असे रूप दाखविण्याची आवश्यकताही नव्हती आणि ते असे रूप पाहूही शकत नव्हते अर्थात् त्यांचे ठिकाणी असे रूप पाहण्याचे सामर्थ्यही नव्हते.

भगवंतांनी म्हटले आहे की, या विश्वरूपाला पूर्वी कोणीही पाहिले नाही परंतु वर्तमानकाळात कोणी पाहत नाही—असे म्हटले नाही. कारण अर्जुनाबरोबर संजयही भगवंताच्या विश्वरूपाला पाहत होते. जर संजयानी पाहिले नसते, तर ते गीतेच्या शेवटी असे कसे म्हणू शकत होते की, भगवंताच्या अती अद्भुत विराटरूपाचे वारंवार स्मरण करून

मला फार मोठे आश्चर्य वाटत आहे आणि मी वारंवार हर्षित होत आहे. (१८।७७)

**विशेष गोष्ट**

भगवंताच्या ''मी आपल्या स्वतः च्या प्रसन्नतेने, कृपेनेच तुला हे विश्वरूप दाखविले आहे'' या म्हणण्यातून एक विलक्षण भाव निघतो की, साधक आपल्यावर भगवंताची जितकी कृपा मानतो, त्यापेक्षा किती तरी पटीने अधिक भगवंताची कृपा असते. भगवंताची जितकी कृपा असते, त्याला मानण्याचे सामर्थ्य साधकात नसते. कारण भगवंताची कृपा अपार-असीम आहे आणि त्याला मानण्याचे सामर्थ्य सीमित आहे.

साधक प्रायः अनुकूल वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीतच भगवंताची कृपा मानत असतो, अर्थात् सत्संग मिळत असेल, साधन ठीक चालत असेल, वृत्ती योग्य असतील, मन भगवंताचे ठिकाणी लीन होत असेल, इत्यादीत तो भगवंताची कृपा मानत असतो. अशा प्रकारे केवळ अनुकूलतेतच कृपा समजणे कृपेला सीमेत बांधणे आहे, ज्यामुळे असीम कृपेचा अनुभव येत नाही. त्या कृपेत खूश होणे भोग आहे. साधकाने कृपेला सीमेत बांधू नये आणि कृपेचा भोगही घेऊ नये.

साधन योग्य रीतीने चालण्यात जे सुख होत असते, त्या सुखात सुखी होणे, खूश होणेच भोग आहे, ज्यामुळे बंधन होत असते—**''सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ''** (१४।६) सुख होणे अथवा सुखाचे ज्ञान होणे दोष नव्हे तर त्याच्याशी संबंध ठेवणे, त्यापासून सुखी होणे, प्रसन्न होणे हाच दोष आहेः यामुळे अर्थात् साधनजन्य सात्त्विक सुख भोगल्याने गुणातीत होण्यात बाधा येते. म्हणून साधकाने फारच सावधानी बाळगून या सुखापासून असंग झाले पाहिजे. जो साधक या सुखाशी असंग होत नाही अर्थात् यात प्रसन्न होऊन सुखाचा भोग घेत राहतो, तोही जर आपल्या साधनेत तत्परतेने लागून राहील, तर काही काळानंतर त्याला त्या सुखाविषयी आपोआप नावड निर्माण होईल. परंतु जो त्या सुखापासून सावधानी बाळगून असंग राहील, त्याला लवकरच वास्तविक तत्त्वाचा अनुभव येतो.

**परिशिष्ट भाव—'मया प्रसन्नेन'** पदांनी भगवान् अर्जुनाला म्हणतात की, हे उग्र विराटरूप मी तुला माझ्या प्रसन्नतेने दाखविले आहे, क्रोधाने नव्हे. मग तू भयभीत का होत आहेस? तुझे भयभीत होणे अनुचित आहे.

*संबंध—विश्वरूप दर्शन होण्यासाठी भगवंताच्या कृपेशिवाय दुसरे कोणतेही साधन नाही. या विषयाचे विशेष वर्णन पुढील श्लोकात करत आहेत.*

## न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः।
## एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर॥ ४८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कुरुप्रवीर** | = हे कुरुश्रेष्ठ! | | शास्त्राध्ययनाने | **न** | = न |
| **नृलोके** | = मनुष्यलोकात | **न** | = न | **क्रियाभिः** | = संपूर्ण क्रियांनी |
| **एवं रूपः** | = अशाप्रकारे विश्वरूप धारण करणारा | **दानैः** | = दानाने | **त्वदन्येन** | = तुझ्याशिवाय (कृपापात्रशिवाय) दुसऱ्या कोणाकडून |
| | | **न** | = न | | |
| **अहम्** | = मी | **उग्रैः** | = उग्र | | |
| **न, वेद-यज्ञाध्ययनैः** | = न वेदाध्ययनाने न यज्ञानुष्ठानाने न | **तपोभिः** | = तपाने | **द्रष्टुम्** | = पाहिले जाणे |
| | | **च** | = आणि | **शक्यः** | = शक्य आहे. |

***व्याख्या*—कुरुप्रवीर—**येथे अर्जुनासाठी ''कुरु प्रवीर'' संबोधन देण्याचा अभिप्राय, संपूर्ण कुरुवंशीयांत माझ्यापासून उपदेश ऐकण्याची, माझ्या रूपाला पाहण्याची आणि जाणून घेण्याची तुला जिज्ञासा झाली तर ही कुरुवंशीयांत तुझी श्रेष्ठता आहे. तात्पर्य, भगवंताला पाहण्याची इच्छा, जाणून घेण्याची इच्छा होणे हीच वास्तविक मनुष्याची श्रेष्ठता आहे.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः—** वेदाध्ययन, यथासांग यज्ञानुष्ठान, मोठ्यात मोठे दान, उग्र तपश्चर्या (कठीणाती कठीण), तीर्थ, व्रतादिक शुभ कर्म हे सर्वचे सर्व मिळूनही, विश्वरूप दर्शनात हेतू बनू शकत नाहीत. कारण जितके काही कर्म केले जातात, त्या सर्वांचा आरंभ आणि समाप्ती होत असते. म्हणून त्या कर्मांने मिळणारे फलही आदि आणि अंत असणारेच असते. म्हणून अशा कर्मांनी भगवंताचे अनंत, असीम, अव्यय, दिव्य विश्वरूपाचे दर्शन कसे होऊ शकते? त्याचे दर्शन तर केवळ भगवंताच्या कृपेनेच होते. कारण भगवान् नित्य आहेत आणि त्यांची कृपाही नित्य

असते. म्हणून नित्य कृपेनेच अर्जुनाला भगवंताचे नित्य, अव्यय, दिव्य, विश्वरूपाचे दर्शन झाले आहे. तात्पर्य, एका किंवा असंख्य साधनातही हे सामर्थ्य नाही की, ते विराटरूपाचे दर्शन करवू शकतील. विराटरूपाचे दर्शन तर केवळ भगवंताच्या कृपेने, प्रसन्नतेनेच होऊ शकते.

गीतेत बहुतेक यज्ञ, दान आणि तप—या तिन्हीचेच वर्णन येते. आठव्या अध्यायाच्या अठ्ठावीसाव्या श्लोकात आणि या अध्यायाच्या त्रेपन्नाव्या श्लोकात वेद, यज्ञ, दान आणि तप—या चारांचे वर्णन आले आहे आणि येथे वेद, यज्ञ, दान, तप आणि क्रिया—या पाचांचे वर्णन आले आहे. आठव्या अध्यायाच्या अठ्ठावीसाव्या श्लोकात सप्तमी विभक्ती आणि बहुवचन तसेच येथील श्लोकात तृतीया विभक्ती आणि बहुवचनाचा प्रयोग झाला आहे. परंतु दुसऱ्या ठिकाणी बहुतेक प्रथमा विभक्ती आणि एक वचनाचा प्रयोग आढळतो.

येथे तृतीया विभक्ती आणि बहुवचन देण्याचे तात्पर्य, या वेद, यज्ञ, दान इत्यादी साधनांपैकी एक-एक साधन विशेषतेने पुष्कळ वेळा केले गेले, अथवा सर्व साधने विशेष रीतीने अनेक वेळ केली गेली तरीही, ती सर्वची सर्व साधने विश्वरूपाच्या दर्शनाला कारण होऊ शकत नाहीत; अर्थात् यांच्याद्वारा विश्वरूप पाहिले जाऊ शकत नाही. कारण विश्वरूपाचे दर्शन कोण्या कर्माचे फल नव्हे.

जसे वेद, यज्ञ इत्यादी साधनांनी येथे विश्वरूप पाहिले जाऊ शकत नाही—असे म्हणून विश्वरूप दर्शनाची दुर्लभता सांगितली, तसेच पुढे त्रेपन्नाव्या श्लोकात वेद, यज्ञ इत्यादी साधनांनी चतुर्भुज रूप पाहिले जाऊ शकत नाही—असे म्हणून चतुर्भुजरूप—दर्शनाची दुर्लभता दाखविली. चतुर्भुजरूप पाहण्यात अनन्यभक्तीला साधन म्हटले आहे (११।५४), कारण ते रूप असे विलक्षण आहे की, त्याचे दर्शन देवताही इच्छितात. म्हणून त्या रूपात भक्ती होऊ शकते. परंतु विश्वरूपाला पाहिले तर भीती वाटू लागते, म्हणून अशा रूपात भक्ती कशी होईल ? प्रेम कसे निर्माण होईल ? म्हणून याच्या दर्शनात भक्तीला साधन म्हटले नाही. हे तर केवळ भगवंताच्या प्रसन्नतेने, कृपेनेच पाहिले जाऊ शकते.

**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन**—मनुष्य-लोकात या साधनांनी तुझ्याशिवाय माझे विश्वरूप कोणीही पाहू शकत नाही—याचा अर्थ असा नाही की, या साधनेने तू पाहू शकतोस. तुला तर मी माझ्या प्रसन्नतेनेच हे रूप दाखविले आहे.

संजयालाही जे विश्वरूपाचे दर्शन होत होते, तेसुद्धा व्यासांच्या कृपेनेच दिव्य दृष्टी प्राप्त झाल्यामुळे होत होते, कोण्या दुसऱ्या साधनाने नव्हे. तात्पर्य, भगवान्, त्यांचे भक्त आणि संत ह्यांची कृपा यांनी जे काम होते, ते साधनाने होत नाही. त्यांची कृपादेखील अहैतुकी असते.

कित्येक लोक अज्ञानाने म्हणतात की, भगवंतांनी अर्जुनाला विश्वरूप दाखविले नव्हते तर असे म्हटले होते की, माझ्या शरीराच्या कोण्या एका अंशात अनंत ब्रह्मांड आहेत; परंतु वास्तविक असे नाहीच. स्वतः भगवंतांनी म्हटले आहे की, "माझ्या शरीरात एका ठिकाणी चराचरासह संपूर्ण जगताला आता पाहून घे" (११।७) जेव्हा अर्जुनाला ते दिसेना तेव्हा भगवान् म्हणाले,"तू आपल्या या चर्मचक्षूंनी माझ्या विश्वरूपाला पाहू शकत नाहीस, म्हणून मी तुला दिव्य चक्षू देतो" (११।८) नंतर भगवंतांनी अर्जुनाला दिव्यचक्षू देऊन साक्षात् आपले स्वरूप दाखविले. संजयानेही म्हटले आहे की, "भगवंताच्या शरीरात एका ठिकाणी स्थित असलेल्या विश्वरूपाला अर्जुनाने पाहिले" (११।१३) अर्जुनानेही विश्वरूपाचे दर्शन करत असताना म्हटले की, "मी आपल्या शरीरात संपूर्ण प्राण्यांच्या समुदायांना तसेच ब्रह्मा, विष्णू, महेश इत्यादी सर्वांना पाहत आहे" (११।१५) इत्यादी इत्यादी. यावरुन सिद्ध झाले की, भगवंतांनी अर्जुनाला प्रत्यक्षात आपल्या विश्वरूपाचे दर्शन करविले होते. दुसरी गोष्ट, समजून देण्यासाठी तर ज्ञानचक्षू असतात (१३।३४,१५।११) परंतु दिव्यचक्षूने साक्षात् दर्शनच होत असते. म्हणून भगवंतांनी केवळ समजून सांगितले, असे म्हणता येत नाही.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकाचे तात्पर्य, स्वतःच्या सामर्थ्याने कोणी भगवंताच्या समग्ररूपाला पाहू इच्छिल तर पाहू शकत नाही (१०।२), तर भगवंताच्या कृपेनेच पाहू शकतो.

***संबंध**—अर्जुनाची भीती दूर करण्यासाठी भगवान् पुढील श्लोकात त्यांना "देवरूप" पाहण्याची आज्ञा करतात.*

## मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।
## व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य॥४९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = हे | **घोरम्** | = भयंकर | **ते** | = तू |
| **मम** | = माझे | **रूपम्** | = रूप | **व्यथा** | = व्यथित |
| **ईदृङ्** | = अशा प्रकारचे | **दृष्ट्वा** | = पाहून | **मा** | = होऊ नको |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **च** | = आणि | **प्रीतमनाः** | = प्रसन्नचित्त होऊन | **मे** | = माझ्या |
| **विमूढ भावः** | = मूढभावाला (ही) | **त्वम्** | = तू | **इदम्** | = या (चतुर्भुज) |
| **मा** | = प्राप्त होऊ नको. (आता) | **पुनः** | = पुन्हा | **रूपम्** | = रूपाला |
| **व्यपेतभीः** | = निर्भय (आणि) | **तत्, एव** | = त्याच | **प्रपश्य** | = उत्तमरीतीने पाहून घे. |

*व्याख्या*— **मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्**—विक्राळ दाढांमुळे भयभीत करणाऱ्या माझ्या मुखात योद्धेलोक अती वेगाने जात आहेत, त्यापैकी कित्येक चूर्ण झालेल्या मस्तकासह दातांच्या फटीत अडकलेले दिसत आहेत आणि मी प्रलय काळाच्या अग्नी-प्रमाणे प्रज्वलित मुखाने संपूर्ण लोकांचा घास करत असून त्यांना चहू बाजूंनी चाटत आहे—अशा प्रकारच्या माझ्या भयंकर रूपाला पाहून तुला व्यथा न होता, प्रसन्नता वाटली पाहिजे. तात्पर्य, पूर्वी (११।४५ मध्ये) तू जो माझ्या कृपेला पाहून हर्षित झाला होतास, तर माझ्या कृपेकडे दृष्टी असल्याने तुझे हर्षित होणे योग्य होते परंतु हे व्यथित होणे योग्य नव्हे.

अर्जुनाने जे पूर्वी म्हटले आहे—''**प्रव्यथितास्तथाहम्**'' (११।२३) आणि ''**प्रव्यथितान्तरात्मा**'' (११।२४) त्याच्या उत्तरातच भगवान् येथे म्हणत आहेत ''**मा ते व्यथा**''

मी कृपा करूनच असे रूप दाखवित आहे. याला पाहून तू मोहित होता कामा नये ''**मा च विमूढ भावः**''. दुसरी गोष्ट, मी तर प्रसन्नच आहे आणि स्वतःच्या प्रसन्नतेनेच तुला हे रूप दाखवित आहे, परंतु तू वारंवार हे म्हणत आहेस की, ''प्रसन्न व्हा, प्रसन्न व्हा,'' हाच तुझा विमूढभाव आहे. तू याचा त्याग कर. तीसरी गोष्ट, पूर्वी तूच म्हटले होतेस की, माझा मोह समाप्त झाला (११।१). परंतु वास्तविक तुझा मोह अद्याप समाप्त झालेला नाही. तू हा मोह सोडून दिला पाहिजे आणि निर्भय होऊन आणि प्रसन्न मनाने माझे हे देवरूप पाहिले पाहिजे.

तुझा आणि माझा जो संवाद आहे, हा तर प्रसन्नतेने, आनंदाने, लीलारूपाने झाला पाहिजे. यात भय आणि मोह मुळीच असू नये. मी तुझ्या म्हणण्यानुसार घोडे हाकतो आहे, बोलतो आहे, विश्वरूप दाखवितो आहे, इत्यादी सर्व काही करत असतानाही तुला माझ्यात कोणती विकृती दिसली आहे काय? *माझ्यात काही फरक पडला आहे काय? तसेच माझ्या विश्वरूपाला पाहून तुझ्यातही कोणती विकृती येता कामा नये.

हे अर्जुन! तुला जी भीती वाटत आहे, ती शरीरा-विषयी अहंता-ममता (मी-माझेपणा) असल्यानेच वाटत आहे अर्थात् अहंता-ममतेची जी वस्तू (शरीर) नष्ट होऊ नये, या अनुषंगानेच तू भयभीत होत आहेस, हा तुझा मूर्खपणा आहे, अज्ञान आहे. तू याचा त्याग कर.

आजसुद्धा ज्या कोणाला जेथे कोठे ज्या कोणापासून भीती वाटते ती भीती शरीराविषयी अहंता-ममता असल्यानेच वाटत असते. शरीराविषयी अहंता-ममता असल्याने, तो उत्पत्ति-विनाशशील वस्तूला (प्राण) ठेवू इच्छितो. हाच मनुष्याचा मूर्खपणा आहे आणि हेच आसुरी संपत्तीचे मूळ आहे. परंतु जे भगवंताला सन्मुख झाले आहेत. त्यांचा प्राणा-विषयी मोह राहत नाही तर त्यांचा सर्वत्र भगवद्‌भाव झालेला असतो आणि ते केवळ भगवंतावरच प्रेम करत असतात. म्हणून ते निर्भय होतात. त्यांचे भगवंताकडे सम्मुख होणे दैवी संपत्तीचे मूळ आहे. नृसिंह भगवंताच्या भयंकर रूपाला पाहून देवता इत्यादी सर्व भयभीत झाले परंतु प्रल्हाद घाबरले नाहीत, कारण प्रल्हादाची सर्वत्र भगवद्‌बुद्धी होती. म्हणून नृसिंह भगवंताजवळ जाऊन त्यांनी साष्टांग प्रणाम केला, त्यावेळी नृसिंह भगवंतांनी प्रल्हादाला मांडीवर घेतले व त्याला जीभेने चाटू लागले.

**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य**—अर्जुनाने पंचेचाळीसाव्या श्लोकात म्हटले होते, ''**भयेन च प्रव्यथितं मनो मे,**'' म्हणून भगवंतांनी ''**भयेन**'' साठी म्हटले आहे, ''**व्यपेतभीः**'' अर्थात् तू निर्भय हो आणि ''**प्रव्यथितं मनः**'' साठी म्हटले आहे ''**प्रीतमनाः**'' अर्थात् तू प्रसन्न मनाचा हो.

भगवंतांनी विराटरूपात अर्जुनाला जे चतुर्भुज दाखविले होते, त्यासाठीच भगवान् ''**पुनः**'' पद देऊन म्हणत आहेत की, तेच माझे हे रूप तू पुन्हा चांगल्या रीतीने पाहून घे.

''**तदेव**'' म्हणण्याचे तात्पर्य, तू देवरूपा (विष्णुरूप) बरोबर ब्रह्मदेव, शंकर इत्यादी देवता आणि भयानक विश्वरूप पाहू इच्छित नाहीस केवळ देवरूपच पाहू इच्छित आहेस, म्हणून तेच रूप तू चांगल्या रीतीने पाहून घे.

* (१) स्वतः मध्ये अनेक प्रकारचे परिवर्तन झालेले पाहूनही, अर्जुन सर्व अवस्थांमध्ये भगवंतास निर्विकारच मानत आहेत, म्हणून त्यांनी गीतेच्या आदि, मध्य आणि अंतात (गीता १।२१,११।४२, आणि १८।७३ मध्ये) भगवंतासाठी 'अच्युत' ह्या संबोधनाचा उपयोग केला आहे.

अर्जुनाच्या प्रार्थनेनुसार भगवान् आता जे रूप दाखवू इच्छित आहेत, त्यासाठी भगवंत येथे ''**इदम्**'' शब्दाचा प्रयोग करतात.

**संजयाची आणि अर्जुनाची दिव्यदृष्टी किती वेळ राहिली ?**

संजयाला वेदव्यासाने युद्धाच्या आरंभी दिव्यदृष्टी दिली होती,* त्यामुळे ते धृतराष्ट्राला युद्धाचा समाचार सांगत होते. परंतु जेव्हा दुर्योधनाच्या मृत्यूने संजय शोकाने व्याकूळ झाले, तेव्हा संजयाची ती दिव्यदृष्टी समाप्त झाली.†

अर्जुनाने विश्वरूप दाखविण्याची प्रार्थना केल्याने भगवंतांनी अर्जुनाला दिव्य दृष्टी दिली ''**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्**'' (११।८) आणि अर्जुन विराटरूप भगवंताच्या देवरूप, उग्ररूप, इत्यादी रूपांचे दर्शन करू लागले. जेव्हा अर्जुनासमोर अत्युग्ररूप आले, तेव्हा ते घाबरले आणि भगवंताची स्तुति-प्रार्थना करत म्हणू लागले की, ''माझे मन भयाने व्यथित होत आहे, आपण मला तेच चतुर्भुजरूप दाखवा''. तेव्हा भगवंतांनी आपले चतुर्भुजरूप दाखवले आणि मग द्विभुजरूप बनले. यावरुन सिद्ध होते की, येथपर्यंतच (एकोणपन्नासाव्या श्लोकात) अर्जुनाची दिव्य दृष्टी राहिली. एक्कावन्नाव्या श्लोकात स्वतः अर्जुनाने म्हटले आहे की, ''मी आपले सौम्य मनुष्यरूप पाहून सचेत झालो आहे आणि आपल्या स्वाभाविक स्थितीला प्राप्त झालो आहे.''

येथे शंका येत आहे की, अर्जुन तर पूर्वीही व्यथित (व्याकूळ) झाले होते—''**दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम्**'' (११।२३) ''**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा**'' (११।२४), म्हणून त्याच वेळी त्यांची दिव्यदृष्टी समाप्त व्हावयास पाहिजे होती. याचे समाधान असे आहे की, त्यावेळी अर्जुन इतके भयभीत झाले नव्हते, जितके आता झाले आहेत. यावेळी तर अर्जुन भयभीत होऊन भगवंताला वारंवार नमस्कार करत आहेत आणि त्यांना चतुर्भुजरूप दाखवण्यासाठी प्रार्थनाही करत आहेत (११।४५) म्हणून यावेळी अर्जुनाची दिव्य दृष्टी समाप्त होते.

दुसरे कारण हेही मानले जाऊ शकते की, पूर्वी अर्जुनाची विश्वरूप पाहण्याची विशेष आवड (इच्छा) होती ''**द्रष्टुमिच्छामि ते रूपम्**'' (११।३), म्हणून भगवंतांनी अर्जुनाला दिव्य दृष्टी दिली. परंतु आता अर्जुनाला विश्वरूप पाहण्याची आवड राहिली नाही आणि ते भयभीत झाल्याने चतुर्भुजरूप पाहण्याची इच्छा करत आहेत. म्हणून (दिव्य दृष्टीची आवश्यकता नसल्याने) त्यांची दिव्य दृष्टी समाप्त होते.

जर संजय आणि अर्जुन शोकाने, भयाने व्यथित (व्याकूळ) झाले नसते तर त्यांची दिव्य दृष्टी पुष्कळ काळ पर्यंत राहिली असती आणि ते आणखी पुष्कळ पाहत राहिले असते. परंतु शोक आणि भयाने व्याकूळ झाल्याने त्यांची दिव्य दृष्टी समाप्त झाली. त्याचप्रमाणे जेव्हा मनुष्य मोहाने संसारात आसक्त होतो, तेव्हा भगवंताने दिलेली विवेकदृष्टी काम करत नाही. जसे मनुष्याचा पैशात फार मोह असतो, तर तो त्यासाठी चोरी करू लागतो, मोह जर अधिक वाढला तर दरोडेही घालतो. तसेच अत्यधिक मोह वाढला तर तो दुसऱ्याची हत्याही करत असतो. अशा प्रकारे जस-जसा मोह वाढत जाईल तस-तसा त्याचा विवेक नष्ट होत जातो. जर मनुष्याने मोहात न फसता आपल्या विवेकदृष्टीला महत्त्व दिले तर त्याचा स्वतःचा उद्धार होऊन, संपूर्ण संसाराचा उद्धार करणारा असा तो होऊ शकतो.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने घाबरून भगवंताला म्हटले—'**तत्क्षामये त्वामहमप्रमेयम्**' (११।४२) तेव्हा भगवान् म्हणतात की, मी जरी शांत अथवा उग्र कोणत्याही रूपात दिसलो तरी आहे तर तुझा सखाच! तू घाबरलास, तर ही तुझी मूर्खता आहे, मित्रतेत ढिलेपणा आहे! जे काही दिसत आहे ती सर्व माझीच लीला आहे. यात घाबरण्याचे काय कारण आहे? मित्रतेमध्ये कोण लहान आणि कोण मोठा?

भगवान्च जगत्‌रूपाने प्रकट झाले आहेत. म्हणून हे जगत् भगवंताचा आदी अवतार म्हटला जातो—'**आद्योऽवतारः पुरुषः परस्य**' (श्रीमद्भा० २।६।४१) जसे भगवंताने राम, कृष्ण इत्यादी रूपाने अवतार घेतला आहे तसेच जगत्‌रूपानेही अवतार घेतला आहे. ह्याला अवतार यासाठी म्हटले आहे की, यात भगवान् दृश्यरूपने दिसून येतात. अवताराच्या काळात लौकिक दृष्टीने दिसूनही भगवान् सदा अलौकिकच राहतात (गीता ४—६). परंतु राग-द्वेषामुळे अज्ञान्यांना भगवान् लौकिक दिसतात. (गीता ७।२४-२५, ९।११).

---

* एष ते सञ्जयो राजन् युद्धमेतद् वदिष्यति। एतस्य सर्वसंग्रामे न परोक्षं भविष्यति॥

चक्षुषा सञ्जयो राजन् दिव्येनैव समन्वितः। कथयिष्यति ते युद्धं सर्वज्ञश्च भविष्यति॥ (महाभारत भीष्म० २।९-१०)

राजन्! हा संजय आपल्याला या युद्धाचा सर्व समाचार सांगेल. संपूर्ण संग्रामभूमीमध्ये याला प्रत्यक्ष दिसणार नाही अशी कोणतीच गोष्ट नसेल. राजन्! संजय दिव्यदृष्टीने संपन्न होईल आणि तुम्हाला युद्धाची सर्व हकीकत सांगेल.

† तव पुत्रे गते स्वर्गे शोकार्त्तस्य ममानघ। ऋषिदत्तं प्रणष्टे तद् दिव्यदर्शित्वमद्य वै॥ (महा० सौप्तिक० ९।६२)

निष्पाप नरेश! आपला पुत्र स्वर्गलोकी गेल्यामुळे मी शोकाकुल झालो आहे आणि महर्षी व्यासांनी मला दिलेली दिव्यदृष्टीही आता समाप्त झाली आहे.

भगवान् शांत अथवा उग्र कोणत्याही रूपात आले, ती त्यांची मर्जी असते. सुंदर दृश्य असेल, फुले उमलली असतील, सुगंध येत असेल तर तेही भगवंताचे रूप आहे आणि मांस, हाडे, मल पडलेला असेल, दुर्गंध येत असेल तर तेही भगवंताचे रूप आहे. भगवंताशिवाय काहीही नाही. भगवंताने राम, कृष्ण इत्यादी रूपेही धारण केली आणि मत्स्य, कच्छप, वराह इत्यादी रूपेही धारण केली. ते कोणतीही रूपे धारण करोत, आहेत तर भगवान्च! रूप तर भगवंताचे आहे आणि क्रिया त्यांची लीला आहे. कोणी पाप, अन्याय करताना दिसला तर समजावे की, भगवान् कलियुगाची लीला करत आहेत. ते जशी रूपे धारण करतात, तशीच लीला (क्रिया) असतात.* मूर्तीचे रूप (अर्चावतार) धारण करून ते मूर्तीप्रमाणेच अचल राहण्याची लीला करतात. मूर्तिरूप धारण करून क्रिया करण्यात शोभा नसते, तर क्रिया न करण्यातच शोभा असते नाही तर तो अर्चावतार कसा राहील? वराह (डुक्कर) रूप धारण करून ते वराहाप्रमाणेच क्रिया करतात आणि मनुष्यरूप धारण करून ते मनुष्याप्रमाणे क्रिया करतात.† ते कोणतेही रूप धारण करून कशीही क्रिया करोत, त्यामुळे भक्तांच्या हृदयात कोणताही विकार येत नाही, कारण त्यांच्या दृष्टीत एका भगवंताशिवाय, दुसरे काहीच नाही, झालेच नाही, होणारच नाही, होणे संभव नाही.

आपणाला जो संसार दिसतो, ते भगवंताचे विराटरूप नाही, कारण विराटरूप तर दिव्य आणि अव्यय आहे, परंतु दिसत असलेला संसार भौतिक आणि नाशवान् आहे. जसे आपणाला भौतिक वृंदावन तर दिसते परंतु त्याच्या आतील दिव्य वृंदावन दिसत नाही, तसेच आपणाला भौतिक विश्व तर दिसते परंतु त्याच्या आतील दिव्य विश्व (विराटरूप) दिसत नाही. असेन दिसण्यात कारण सुखभोगाची इच्छा हे आहे. भोगेच्छे मुळेच जडता, भौतिकता, मलिनता आली आहे. जर भोगेच्छेला अनुसरून संसारात आकर्षण नसेल तर सर्व काही चिन्मय विराटरूपच आहे.

तत्त्वबोध झाल्यावर ज्ञान्याला संसार चिन्मयरूपाने दिसतो, परंतु प्रेमी भक्ताला तो माधुर्यरूपाने दिसतो. माधुर्यरूपाने दिसल्यावर, जसे स्वतःच्या शरीरावर सर्वांची स्वाभाविक प्रियता असते, तसेच भक्ताची संपूर्ण प्राण्यांशी स्वाभाविक प्रियता होते. परंतु अर्जुनाने ऐश्वर्यरूपाने भगवंताचे विराटरूप पाहिले होते, कारण ते. तेच रूप पाहू इच्छित होते—'**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम**' (११।३). माधुर्यात प्रियता विशेष असते आणि ऐश्वर्यात प्रभाव विशेष असतो. तात्पर्य, दिव्य विराटरूप एक असूनही भावनेनुसार अनेक रूपात दिसते आणि अनेक रूपात दिसूनही एकच राहते. एकतेत अनेकता आणि अनेकतेत एकताही भगवंताची विलक्षणता, अलौकिकता, विचित्रता आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला ज्या रूपाला पाहण्याची आज्ञा केली होती, भगवान् आपले ते विष्णुरूप दाखवित आहेत. याचे वर्णन संजय पुढील श्लोकात करत आहेत.*

*सञ्जय उवाच*

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा॥५०॥**

---

* जथा अनेक बेष धरि नृत्य करइ नट कोइ।
सोइ सोइ भाव देखावइ आपुन होइ न सोइ॥ (मानस, उत्तर० ७२ ख)

† भगवान् श्रीकृष्ण उत्तङ्क ऋषींना म्हणतात—
धर्मसंरक्षणार्थाय धर्मसंस्थापनाय च॥
तैस्तैर्वेषैश्च रूपैश्च त्रिषु लोकेषु भार्गव। (महाभारत, आश्व० ५४। १३-१४)
'मी धर्माचे रक्षण आणि स्थापनेसाठी तिन्ही लोकात पुष्कळशा योनीत अवतार धारण करून त्या त्या रूप आणि वेषांद्वारा त्यानुरूप वर्तन करतो.'

यदा त्वहं देवयानौ वर्तामि भृगुनन्दन। तदाहं देववत् सर्वमाचरामि न संशयः॥
यदा गन्धर्वयोनौ वा वर्तामि भृगुनन्दन। तदा गन्धर्ववत् सर्वमाचरामि न संशयः॥
नागयोनौ यदा चैव तदा वर्तामि नागवत्। यक्षराक्षस योन्योस्तु यथावद् विचराम्यहम्॥
(महाभारत, आश्व० ५४। १७-१९)

'भृगुनंदन! जेव्हा मी देवयोनीत अवतार घेतो, तेव्हा देवतांप्रमाणेच सर्व आचारा-विचाराचे पालन करतो, यात संशय नाही.'
'जेव्हा मी गन्धर्वयोनीत प्रकट होतो, तेव्हा माझे सर्व आचार-विचार गन्धर्वांच्या सारखेच होतात, यांत संशय नाही.'
'जेव्हा मी नागयोनीत जन्म (अवतार) घेतो, तेव्हा नागांप्रमाणेच वर्तन करतो. यक्ष आणि राक्षसांच्या योनीत प्रकट झाल्यावर मी त्यांच्याच आचार-विचाराचे यथावत् रूपाने पालन करतो.'

संजय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वासुदेवः** | = वासुदेव भगवंताने | **रूपम्** | = रूप (देवरूप) | | मनुष्यरूप) |
| **अर्जुनम्** | = अर्जुनाला | **दर्शयामास** | = दाखविले | **भूत्वा** | = धारण करून |
| **इति** | = असे | **च** | = आणि | **एनम्** | = त्या |
| **उक्त्वा** | = म्हणून | **महात्मा** | = महात्मा श्रीकृष्णांनी | **भीतम्** | = भयभीत झालेल्या अर्जुनाला |
| **भूयः** | = पुन्हा | **पुनः** | = पुन्हा | | |
| **तथा** | = त्याच रीतीने | **सौम्यवपुः** | = सौम्यरूप (द्विभुज | **आश्वासयामास** | = आश्वासन दिले. |
| **स्वकम्** | = आपले | | | | |

*व्याख्या*— **इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः**—अर्जुनाने जेव्हा भगवंताना चतुर्भुजरूप धारण करण्यासाठी प्रार्थना केली, तेव्हा भगवंतांनी म्हटले की, माझ्या या विश्वरूपाला पाहून तू व्यथित आणि भयभीत होऊ नको. तू प्रसन्न मनाने या माझ्या रूपाला पहा. (११।४९) भगवंताच्या ह्याच कथनाला संजयाने येथे ''**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा**'' पदांनी म्हटले आहे.

''**तथा**'' म्हणण्याचे तात्पर्य, ज्याप्रमाणे भगवंतांनी कृपेला परवश होऊन आपले विश्वरूप दाखविले होते, त्याच-प्रमाणे कृपेला परवश होऊन भगवंतांनी अर्जुनाला चतुर्भुजरूप दाखविले. हे चतुर्भुजरूप पाहण्यात अर्जुनाची कोणती साधना, योग्यता होती असे नव्हे, तर केवळ भगवंताची कृपाच आहे.

''**भूयः**'' म्हणण्याचे तात्पर्य, ज्या देवरूपाला (चतुर्भुजरूप) अर्जुनाने विश्वरूपाच्या अंतर्गत पाहिले होते (११।१५,१७) आणि जे दाखविण्यासाठी अर्जुनाने प्रार्थना केली होती (११।४५,४६) तेच रूप भगवंतांनी पुनः दाखविले.

**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा**—भगवान् श्रीकृष्णांनी प्रथम अर्जुनाला चतुर्भुजरूप दाखविले. मग अर्जुनाच्या प्रसन्नतेसाठी महात्मा भगवान् श्रीकृष्णांनी पुन्हा द्विभुजरूप (मनुष्यरूप) धारण केले आणि त्यांनी विश्वरूपाला पाहून भ्यालेल्या अर्जुनाला आश्वासन दिले.

भगवान् श्रीकृष्ण द्विभुज होते का चतुर्भुज होते? याचे उत्तर असे की, भगवान् नित्य निरंतर द्विभुजरूपातच राहत होते, परंतु वेळोवेळी आवश्यकता वाटत होती त्यावेळी ते चतुर्भुजरूप होत होते.

दहाव्या आणि अकराव्या अध्यायात भगवंतांनी आपल्या विभूतींचे वर्णन करण्यातही आपली महत्ता, प्रभाव, सामर्थ्य दाखविले आहे आणि आपल्या अत्यंत विलक्षण विश्वरूपाला दाखविण्यातही, आपला प्रभाव स्पष्ट केला आहे. जर मनुष्याने भगवंताच्या अशा महान् प्रभावाला जाणले अथवा मानले तर त्याचे संसारात आकर्षण राहणार नाही. तो नेहमीसाठी संसार-बंधनातून मुक्त होईल.

अर्जुनावर भगवंताची किती अद्भुत कृपा आहे की, त्यांनी प्रथम विश्वरूप दाखविले, नंतर देवरूप (विष्णुरूप) दाखविले आणि त्यानंतर मनुष्यरूप (द्विभुजरूप) बनले. त्याचबरोबर भगवंतांनी आम्हां लोकांवरही किती विलक्षण, अलौकिक कृपा केली आहे की, जेथे-कोठे, ज्या-काही विशेषतेकडे आपले मन जाईल, त्याच ठिकाणी आपण भगवंताचे चिंतन करू शकतो आणि भगवंताच्या विश्वरूपाचे पठन-पाठन, चिंतन करू शकतो. ह्या भयंकर अशा काळात आपल्याला भगवंताच्या विभूती तसेच विश्वरूपाचे चिंतन इत्यादीची जी संधी मिळाली आहे, यात आपला प्रयत्न, योग्यता कारण नव्हे तर भगवंताची कृपाच कारण आहे. भगवंताच्या या कृपेला पाहून आपण प्रसन्न झाले पाहिजे. या विभूतींच्या श्रवणाची आणि विश्वरूपाच्या चिंतन-स्मरणाची संधी तर त्यावेळीही संजय इत्यादी फार थोड्या व्यक्तींनाच प्राप्त झाली होती. तीच संधी आज आपल्याला प्राप्त झाली आहे. म्हणून आपण ती संधी व्यर्थ दवडता कामा नये.

*संबंध—भगवंतांनी मनुष्यरूप स्वीकारून जेव्हा अर्जुनाला आश्वासन दिले तेव्हा अर्जुन म्हणतात.*

*अर्जुन उवाच*

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः॥५१॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जनार्दन** | = हे जनार्दन! | **इदम्** | = ह्या | **मानुषम्** | = मनुष्य |
| **तव** | = आपल्या | **सौम्यम्** | = सौम्य- | **रूपम्** | = रूपाला |

रूपम् = रूपाला
दृष्ट्वा = पाहून (मी)
इदानीम् = यावेळी
सचेताः = स्थिर चित्त
संवृत्तः = झालो
अस्मि = आहे (आणि)
प्रकृतिम् = आपल्या स्वाभाविक स्थितीला
गतः = प्राप्त झालो आहे.

*व्याख्या*— **दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन**— आपल्या मनुष्यरूपात प्रगट होऊन लीला करणाऱ्या रूपाला पाहून गायी, पशु-पक्षी, वृक्ष, लता इत्यादीही पुलकित होतात* असे सौम्य द्विभुजरूप पाहून मी सावधान झालो आहे, माझे चित्त स्थिर झाले आहे. "**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः**". विराटरूपाला पाहून मी जो भयभीत झालो होतो, ती सर्व भीती आता समाप्त झाली आहे, सर्व व्यथा नष्ट झाली आहे आणि मी आपल्या वास्तविक स्थितीला प्राप्त झालो आहे. "**प्रकृतिं गतः**"

येथे "**सचेताः**" म्हणण्याचे तात्पर्य, जेव्हा अर्जुनाची दृष्टी भगवंताच्या कृपेकडे गेली तेव्हा अर्जुन शुद्धीवर आले आणि ते विचार करू लागले की, कुठे मी आणि कुठे भगवंताचे आश्चर्यकारक विलक्षण विराटरूप.! यात माझी काही योग्यता, अधिकारिता मुळीच नाही. यात तर केवळ भगवंताची कृपाच कृपा आहे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताचे सौम्यरूप द्विभुज असल्यामुळे अर्जुनाने त्याला मनुष्यरूप म्हटले आहे. भगवान् श्रीकृष्ण द्विभुज होते. ब्रह्मवैवर्त पुराणात आले आहे—

**त्वमेव भगवानाद्यो निर्गुणः प्रकृतेः परः। अर्द्धाङ्गो द्विभुजः कृष्णोऽप्यर्द्धाङ्गेन चतुर्भुजः॥**

(प्रकृति० १२। १५)

'आपण सर्वांचे आदि, निर्गुण आणि प्रकृतीहून अतीत भगवान्च आपल्या अर्ध्या अंगाने द्विभुज कृष्ण आणि अर्ध्या अंगाने चतुर्भुज विष्णूच्या रूपात प्रकट झाले आहेत.'

**द्विभुजो राधिकाकान्तो लक्ष्मीकान्तश्चतुर्भुजः। गोलोके द्विभुजस्तस्थौ गोपैर्गोपीभिरावृतः॥**
**चतुर्भुजश्च वैकुण्ठं प्रययौ पद्मया सह। सर्वांशेन समौ तौ द्वौ कृष्णनारायणौ परौ॥**

(प्रकृति० ३५। १४-१५)

'द्विभुज कृष्ण राधिकापती आहेत आणि चतुर्भुज विष्णु लक्ष्मीपती आहेत. कृष्ण गोप-गोपींनी आवृत्त होऊन गोलोकात आणि विष्णु लक्ष्मी बरोबर (पार्षदांसह) वैकुंठात स्थित आहेत. ते कृष्ण आणि विष्णु—दोघेही सर्व प्रकाराने समान अर्थात् एकच आहेत.'

तात्पर्य, द्विभुजरूप (कृष्ण), चतुर्भुजरूप (विष्णु) आणि सहस्रभुजरूप (विराटरूप)—तिन्हीही एकाच समग्र भगवंताची रूपे आहेत.

***संबंध***—*अर्जुनाच्या कृतज्ञेचे अनुमोदन करीत भगवान् म्हणतात*—

*श्रीभगवानुवाच*

# सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम।
# देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः॥ ५२॥

श्रीभगवान् म्हणाले—
मम = माझे
इदम् = हे
यत् = जे
रूपम् = (चतुर्भुज) रूप
दृष्टवान्, असि = (तू) पहिले आहेस,
सुदुर्दर्शम् = त्याचे दर्शन अत्यंतच दुर्लभ आहे.
देवाः, अपि = देवतासुद्धा
अस्य = या
रूपस्य = रूपाला
नित्यम्, = पाहण्यासाठी नित्य
दर्शनकाङ्क्षिणः उत्कंठित राहतात.

*व्याख्या*— **सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम**—येथे "**सुदुर्दर्शम्**" पद चतुर्भुजरूपासाठी आले आहे. विराटरूप अथवा द्विभुजरूपासाठी नव्हे. कारण विराटरूपाची कल्पना

* त्रैलोक्यसौभगमिदं च निरीक्ष्य रूपं यद्गोद्विजद्रुममृगाः पुलकान्यबिभ्रन्॥ (श्रीमद्भा० १०।२९।४०)

देवताना तरी कशी असणार? आणि मनुष्यरूप तर मनुष्यांनाही सुलभ असते तर ते देवतांना काय दुर्लभ असणार ? म्हणून ''**सुदुर्दर्शम्**'' पदाने भगवान् विष्णूचे चतुर्भुजरूपच घेतले पाहिजे ज्याच्यासाठी ''**देवरूपम्**'' (११।४५) आणि ''**स्वकं रूपम्**'' (११।५०) पद आले आहेत.

**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः—** भगवंतांनी येथे म्हटले आहे की, माझे हे जे चतुर्भुजरूप आहे याचे दर्शन फारच दुर्लभ आहे. पुढे त्रेपन्नाव्या-चौपन्नाव्या श्लोकांत म्हटले आहे की, या चतुर्भुजरूपाचे दर्शन वेद, यज्ञ, तप, दान इत्यादी साधनांनी होऊ शकत नाही, तर या रूपाचे दर्शन तर केवळ अनन्यभक्तीनेच होऊ शकते. आता अशी शंका येते की, जर देवताही या रूपाच्या दर्शनाची नित्य लालसा ठेवतात तर मग त्यांना दर्शन का होत नाही? कारण भगवंताच्या दर्शनाची नित्य लालसा राहणे अनन्यभक्तीच आहे. याचे समाधान असे आहे की, वास्तविक देवतांची नित्य लालसा अनन्यभक्ती नव्हे. नित्य लालसा असण्याचे तात्पर्य, नित्य-निरंतर एका परमात्म्याचीच लालसा राहिली पाहिजे, दुसऱ्या कशाचीही लालसा राहू नये. अशी लालसा असणारा दुराचाराती-दुराचारी मनुष्यसुद्धा भगवंताचा भक्त होतो आणि त्याला भगवत्प्राप्ती होते. परंतु अशी अनन्य-लालसा देवतांच्या ठिकाणी नसते. कारण ते बहुतेक भोग भोगण्यासाठीच देवता बनलेले असतात आणि त्यांचा प्रायः भोग भोगण्याचाच उद्देश असतो. तर मग त्यांना लालसा कशी होते? जशी लालसा (इच्छा) जवळजवळ सर्व आस्तिक माणसांमध्ये राहत असते की, ''आपल्याला भगवंताचे दर्शन व्हावे, आपले कल्याण व्हावे.'' त्यांची अशी इच्छा तर असते, परंतु भोग आणि संग्रहाची आवड जशीच्या तशीच कायम राहते. जसे रस्त्याने चालत असता एखाद्याला मणी मिळावा, तसेच (गौणत्वाने) आपली मुक्ती झाली तर बरे होईल.* अशा प्रकारे मनुष्याचे ठिकाणी जशी मुक्तीची इच्छा गौण असते, तसेच भगवंत जर दर्शन देतील तर आपणही दर्शन करू. अशा प्रकारे देवतांचे ठिकाणी दर्शनाची इच्छा गौण असते.

देवतालोक ''आम्ही इतक्या उच्च पदावर आहोत. आमचे लोक, शरीर आणि भोग दिव्य आहेत, आम्ही फार पुण्यवान् आहोत म्हणून आम्हाला भगवंताचे दर्शन झाले पाहिजे'' अशी पोकळ इच्छा करतात म्हणून त्यांना कधी दर्शन होत नाही. कारण त्यांचे ठिकाणी देवत्व, पद इत्यादीचा अभिमान असतो. अभिमान, पद यांच्या बळावर भगवंताचे दर्शन होऊ शकत नाही. म्हणून दहाव्या अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले आहे की, हे भगवंत! ''आपल्या प्रगट होण्याला देवता आणि दानव-ही जाणत नाहीत.'' अशा प्रकारे अर्जुनाने भगवंताला न जाणण्यात देवता आणि दानवांना एका श्रेणीत घातले आहे. याचे तात्पर्य, जसे देवतांजवळ वैभव आहे तसेच दानवां-जवळ विचित्र-विचित्र माया आहे, सिद्धी आहेत. परंतु ते त्यांच्या बळावर भगवंताना जाणून घेऊ शकत नाहीत. त्याच-प्रमाणे, देवतांनी भगवंताच्या दर्शनाची जरी लालसा ठेवली तरीही त्यांना देवत्व-शक्तीने दर्शन होऊ शकत नाही. कारण भगवंताच्या दर्शनात देवत्व कारण नव्हे. तात्पर्य, भगवंताना देवत्व-शक्तीनेही पाहिले जाऊ शकत नाही आणि यज्ञ, तप, दान इत्यादी शुभ कर्मांनीही पाहिले जाऊ शकत नाही (११।५३). त्यांना तर अनन्यभक्तीनेच पाहिले जाऊ शकते. (११।५४) अनन्यभक्तीने देवता आणि मनुष्य दोघेही भगवंताला पाहू शकतात.

''**देवा अपि**'' म्हणण्याचे तात्पर्य, ज्या पुण्याच्या बळावर देवतांना उच्च पद मिळाले आहे, उच्च (दिव्य) भोग मिळाले आहेत, त्या पुण्याच्या बळावर, पद इत्यादीच्या बळावर ते भगवंताचे दर्शन करू शकत नाहीत. तात्पर्य; पुण्यकर्म, हे उच्चलोक, दिव्यभोग तर देऊ शकतात परंतु भगवंताचे दर्शन करविण्यात ते असमर्थ ठरतात. भगवंताच्या दर्शनात हे प्राकृत महत्त्व कुचकामी ठरते.

**परिशिष्ट भाव—**देवतांचे शरीर दिव्य असते परंतु भगवंताचे शरीर त्याहीपेक्षा विलक्षण असते. देवतांचे शरीर भौतिक तेजोमय आणि भगवंताचे शरीर चिन्मय असते. भगवंताचे शरीर सत्-चित्-आनंदमय, नित्य, अलौकिक आणि अत्यंत दिव्य असते.† म्हणून देवताही भगवंताला पाहण्यासाठी उत्कंठित राहतात. जसे सामान्य माणसाला नव-नवीन स्थाने पाहण्याचा छंद असतो, तसेच देवतांना भगवंताला पाहण्याचा छंद असतो, प्रेम नव्हे. तात्पर्य, जसे भक्त प्रेमपूर्वक भगवंताला पाहू इच्छितात, तसे देवता इच्छित नाहीत. म्हणून भगवान् प्रेमी भक्तांच्या तर अधीन असतात, परंतु देवतांच्या अधीन नसतात.

***संबंध—**पूर्व श्लोकात सांगितलेल्या विषयाची पुष्टी पुढील श्लोकात करतात.*

---

* मार्गे प्रयाते मणिलाभवन्मे लभेत मोक्षो यदि तर्हि धन्यः।

† चिदानंदमय देह तुम्हारी। बिगत बिकार जान अधिकारी॥ (मानस अयोध्या० १२७।३)

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥५३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यथा** | = ज्या रीतीने (तू) | | असणारा) मी | **दानेन** | = दानाने |
| **माम्** | = मला | **न** | = न तर | **च** | = आणि |
| **दृष्टवान्** | = पाहिले | **वेदैः** | = वेदांनी, | **न** | = न |
| **असि** | = आहेस, | **न** | = न | **इज्यया** | = यज्ञानेही |
| **एवं विधः** | = तशा प्रकारचा | **तपसा** | = तपाने | **द्रष्टुम्** | = पहिला जाऊ |
| **अहम्** | = (चतुर्भुज | **न** | = न | **शक्यः** | = शकतो. |

*व्याख्या*— **दृष्टवानसि मां यथा**—तू माझे चतुर्भुजरूप माझ्या कृपेनेच पाहिले आहेस. तात्पर्य, माझे दर्शन माझ्या कृपेनेच होऊ शकते, कोणत्या योग्यतेने नव्हे.

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया शक्य एवंविधो द्रष्टुम्**—ही एक सिद्धांताची गोष्ट आहे की, जी वस्तू एखाद्या मूल्याने खरेदी केली जाते; ती वस्तू त्या मूल्यापेक्षा कमी मूल्याची असते. जसे एखादा दुकानदार एक घड्याळ शंभर रुपयात विक्री करत असेल तर ते घड्याळ त्याने कमी मूल्यात घेतलेले असते, तेव्हाच तर तो शंभर रुपयात विक्री करतो. त्याचप्रमाणे अनेक वेदांचे अध्ययन केल्याने, खूप मोठी तपश्चर्या केल्याने, फार मोठे दान देण्याने तसेच भव्य यज्ञानुष्ठान करण्याने भगवंताची प्राप्ती होईल असे नाही. कितीही मोठी क्रिया असली, कितीही योग्यता संपादन केली तरी त्या मूल्याने भगवंत खरेदी केले जाऊ शकत नाहीत. ती सर्व साधने एकत्र केली गेली, तरीही ती भगवत्प्राप्तीचे मूल्य होऊ शकत नाहीत. त्यांच्याद्वारा भगवंतावर अधिकार गाजविला जाऊ शकत नाही. अर्जुनाने याच अध्यायाच्या त्रेचाळीसाव्या श्लोकात स्पष्ट म्हटले आहे की, त्रैलोक्यात आपल्यासारखाही कोणी नाही, तर मग आपल्यापेक्षा अधिक कोण कसा असू शकतो? तात्पर्य, आपल्यापेक्षा अधिक असल्याशिवाय आपल्यावर अधिकार गाजविला जाऊ शकत नाही.

सांसारिक बाबतीत तर अधिक योग्यता संपादन केलेला कमी योग्यता असणाऱ्यावर अधिपत्य करू शकतो, अधिक बुद्धिमान् कमी बुद्धी असणारावर आपला अधिकार गाजवू शकतो, अधिक धनवान् निर्धनावर आपला अधिकार दाखवू शकतो. परंतु भगवान् कोणत्याही बल, बुद्धी, योग्यता, व्यक्ती, वस्तू इत्यादीने खरेदी केले जाऊ शकत नाहीत. कारण ज्या भगवंताच्या संकल्पमात्राने तात्काळ अनंत ब्रह्मांडांची रचना होते, त्याला एका ब्रह्मांडाच्याही कोण्या एका अंशात राहणाऱ्या एखाद्या वस्तू, व्यक्ती इत्यादीने कसे खरेदी केले जाऊ शकते? तात्पर्य हे आहे की, भगवत्प्राप्ती केवळ भगवंताच्या कृपेनेच होत असते. ती कृपा तेव्हा प्राप्त होत असते, जेव्हा मनुष्य आपले सामर्थ्य, समय, समज आणि सामुग्री इत्यादींना भगवंतास संपूर्णपणे अर्पण करून आपल्या ठिकाणी सर्वथा निर्बलता, अयोग्यतेचा अनुभव करतो, अर्थात् आपल्या बल, योग्यता इत्यादीचा मुळीच अभिमान करत नाही. अशा प्रकारे जेव्हा तो संपूर्णपणे निर्बल होऊन आपल्या स्वतः-ला भगवंताना सर्वथा समर्पित करून अनन्यभावाने भगवंताचा धावा करतो, तेव्हा भगवान् तात्काळ प्रगट होतात. कारण जोपर्यंत मनुष्याच्या अंतःकरणात प्राकृत वस्तू, योग्यता, बल, बुद्धी, इत्यादीचे महत्त्व आणि आश्रय असतो, तोपर्यंत भगवान् अत्यंत जवळ असूनही दूर दिसत असतात.

या श्लोकात जी दुर्लभता सांगितली गेली आहे, ती चतुर्भुजरूपासाठीच सांगितली गेली आहे, विश्वरूपासाठी नव्हे. जर याला विश्वरूपासाठी मानले गेले तर पुनरुक्ती दोष येतो, कारण पूर्वी अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात विश्वरूपाची दुर्लभता सांगितली गेली आहे. दुसरी गोष्ट, पुढील श्लोकात भगवंतांनी अनन्यभक्तीने आपल्याला पाहणे शक्य आहे असे म्हटले आहे. विश्वरूपात अनन्यभक्ती होऊच शकत नाही. कारण अर्जुनासारखे शूरवीर पुरुष, भगवंताकडून दिव्य दृष्टी प्राप्त करूनही, विश्वरूपाला पाहून भयभीत झाले, तर त्या रूपात अनन्यभक्ती, अनन्यप्रेम, आकर्षण कसे होऊ शकते? अर्थात् होऊ शकत नाही.

***संबंध***—*जर कोणी एखाद्या साधनाने, एखाद्या योग्यतेने, एखाद्या सामुग्रीने आपणाला प्राप्त करू शकत नाही तर मग आपण कसे प्राप्त केले जाता? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परन्तप॥५४॥**

| | |
|---|---|
| **तु** | = परंतु |
| **परन्तप** | = हे शत्रूतापन |
| **अर्जुन** | = अर्जुन! |
| **एवं विधः** | = अशा प्रकारे |
| **अहम्** | = (चतुर्भुजरूप धारण करणारा) मी |
| **अनन्यया, भक्त्या** | = (केवळ) अनन्य-भक्तिनेच |
| **तत्त्वेन** | = तत्त्वतः |
| **ज्ञातुम्** | = जाणून घेण्यास |
| **च** | = आणि |
| **द्रष्टुम्** | = (साकाररूपात) पाहण्यास |
| **च** | = तसेच |
| **प्रवेष्टुम्** | = प्रवेश (प्राप्त) करून घेण्यास |
| **शक्यः** | = शक्य आहे. |

*व्याख्या*—**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन**—येथे "**तु**" पद पूर्वी सांगितलेल्या साधनेपेक्षा विलक्षण साधन दाखविण्यासाठी आले आहे. भगवान् म्हणतात, "हे अर्जुन! तू मला जसे शङ्ख-चक्र-गदा-पद्मधारी चतुर्भुजरूपात पाहिले आहेस. अशा रूपात मी यज्ञ, दान, तप इत्यादीद्वारा पाहिला जाऊ शकत नाही तर केवळ अनन्यभक्तीनेच मी पाहिला जाऊ शकतो."

अनन्यभक्तीचा अर्थ आहे—केवळ भगवंताचाच, आश्रय असावा, आधार असावा, आशा असावी, विश्वास असावा.*भगवंताशिवाय कोणती योग्यता, बल, बुद्धी इत्यादीचा मुळीच आधार नसावा; त्यांचे अंतःकरणात मुळीच महत्त्व नसावे. ही अनन्यभक्ती स्वद्वाराच होत असते, मन-बुद्धी-इंद्रिये यांच्याद्वारा होऊ शकत नाही. तात्पर्य, केवळ स्व ची व्याकूळतापूर्वक उत्कंठा असावी. भगवंताच्या दर्शना-विना क्षणभर देखील चैन पडू नये. अशी जी आतमध्ये स्वची बेचैनी असते, तीच भगवत्प्राप्तीत मुख्य कारण बनते. या बेचैनीत, व्याकूळतेत अनंत जन्मांची अनंत पापे भस्म होऊन जातात. अशा अनन्यभक्तासाठीच भगवंतानी म्हटले आहे—"जो अनन्यचित्त असणारा भक्त नित्य-निरंतर माझे चिंतन करत असतो, त्याच्यासाठी मी सुलभ आहे" (८।१४) आणि "जे अनन्यभक्त माझे चिंतन करत उपासना करतात, त्यांचा योगक्षेम मी चालवितो" (९।२२)

अनन्यभक्तीचे दुसरे तात्पर्य, आपल्या ठिकाणी भजन-स्मरण करण्याचा, साधन करण्याचा, उत्कंठेने धावा करण्याचा, जो काही आधार असतो; तो आधार मुळीच नसावा. मग साधन कशासाठी करावयाचे आहे? केवळ आपला अभिमान समाप्त करण्यासाठी अर्थात् आपल्या ठिकाणी साधन करण्याच्या बलाचे जे भान होत असते, की, साधनेच्या बळावर मी आपला उद्धार करीन ते नष्ट करण्यासाठीच साधन करावयाचे आहे. तात्पर्य, भगवंताची प्राप्ती साधन करण्याने होत नाही, तर साधनाचा अभिमान गलित झाल्याने होते. साधनाचा अभिमान गलित झाल्याने, साधकावर भगवंताची शुद्ध कृपा परिणाम करत असते, अर्थात् त्या कृपेचा वर्षाव होण्यात कोणतीही बाधा राहत नाही आणि (त्या कृपेने) भगवंताची प्राप्ती होते.

**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुम्**—अशा अनन्यभक्तीनेच मी तत्त्वतः जाणून घेतला जाऊ शकतो. अनन्यभक्तीनेच मी पाहिला जाऊ शकतो आणि अनन्यभक्तीनेच मी प्राप्त केला जाऊ शकतो.

ज्ञानाने देखील भगवान् तत्त्वतः जाणून घेतले जाऊ शकतात आणि प्राप्त केले जाऊ शकतात (१८।५५) परंतु दर्शन देण्यासाठी भगवान् बांधलेले नाहीत.

**ज्ञातुम्**—हे म्हणण्याचे तात्पर्य, मी जसा आहे तसाच्या तसा जाणून घेतला जातो. जाणून घेतला जाण्याचा अर्थ असा नाही की, मी त्याच्या बुद्धीच्या अंतर्गत येतो तर त्याची जाणून घेण्याची शक्ती माझ्याकरवी परिपूर्ण होते. तात्पर्य तो मला "**वासुदेवः सर्वम्**" (७।१९) आणि "**सदसच्चाहम्**" (९।१९) या रीतीने तो माझ्या वास्तविक तत्त्वाला जाणून घेतो.

"**द्रष्टुम्**"—म्हणण्याचे तात्पर्य, तो सगुणरूपात अर्थात् विष्णू, राम, कृष्ण इत्यादी ज्या कोण्या रूपात पाहू इच्छील, त्या रूपात तो मला पाहू शकतो.

"**प्रवेष्टुम्**"—म्हणण्याचे तात्पर्य, तो भगवंताशी आपल्या स्वतःच्या अभिन्नतेचा अनुभव करतो अथवा भगवंताच्या लीलेत त्याचा प्रवेश होत असतो. नित्य लीलेत प्रवेश होण्यात भक्ताची इच्छा आणि भगवंताची मर्जीच मुख्य असते. जरी भगवंताला संपूर्णपणे शरण झाल्यावर भक्ताच्या सर्व इच्छा समाप्त होतात, तरीपण भगवंताची ही एक

---

* एक भरोसो एक बल एक आस बिस्वास। एक राम घन स्याम हित चातक तुलसीदास॥ (दोहावली २७७)
एक बानि करुनानिधान की। सो प्रिय जाके गति न आन की॥ (मानस ३।१०।४)

विलक्षणता आहे की, लीलेत प्रवेश होण्याविषयीची जी भक्ताची इच्छा राहिलेली असते, त्याला ते पूर्ण करून टाकतात. केवळ पारमार्थिक इच्छाच पूर्ण करतात असे नव्हे, तर भक्ताची पूर्वीची यत्किंचित जर सांसारिक इच्छा राहिली असेल, तर तीही भगवान् पूर्ण करतात. जसे भगवद्दर्शनाने पूर्वीच्या इच्छेनुसार ध्रुवाला छत्तीस हजार वर्षाचे राज्य मिळाले आणि विभीषणाला एका कल्पाचे! तात्पर्य, भगवान् भक्ताच्या इच्छेला पूर्ण करतात. मग आपल्या मर्जीनुसार त्याला वास्तविक पूर्णतेची प्राप्ती करवून देतात. ज्यामुळे भक्तासाठी काहीही करणे, जाणून घेणे, मिळविणे शिल्लक राहत नाही.

**विशेष गोष्ट**

भक्ताची जी स्वतःची उत्कट अभिलाषा असते त्या अभिलाषेत अशी ताकद असते की, ती भगवंतातही भक्ताला भेटण्याची उत्कंठा उत्पन्न करते. भगवंताच्या या उत्कंठेत बाधा आणण्याचे कोणातही सामर्थ्य नाही. अनंत सामर्थ्यशाली भगवंताच्या भक्ताकडे वळलेल्या कृपारूपी प्रवाहाला जेव्हा पूर येतो, तेव्हा ती कृपा भक्ताच्या संपूर्ण विघ्नांना समाप्त करून भक्ताच्या योग्यतेचा-अयोग्यतेचा थोडाही विचार न करता भगवंतालासुद्धा परवश करून टाकते, ज्यामुळे भगवान् तात्काळ भक्तासमोर प्रगट होतात.

**परिशिष्ट भाव**—जेथे भगवंताने ज्ञानाची पराकाष्ठा सांगितली आहे, तेथे ज्ञानाने केवळ जाणणे आणि प्रवेश करणे—ह्या दोनच गोष्टी सांगितल्या आहेत—'**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्**' (गीता १८।५५). परंतु येथे भक्तीने जाणणे, पाहणे आणि प्रवेश करणे—'ह्या तीन गोष्टी सांगितल्या आहेत. भक्तीने भगवंताचे दर्शनही होऊ शकते—ही भक्तीची विशेषता आहे परंतु ज्ञानाची पराकाष्ठा झाली तरीही भगवंताचे दर्शन होत नाही. म्हणून भक्तीचा विशेष महिमा आहे. भक्तीत समग्राची प्राप्ती होते.'

ब्रह्माच्या प्राप्तीत जाणणे आणि प्रवेश करणे—ह्या दोन गोष्टी होऊ शकतात, परंतु समग्राच्या प्राप्तीत जाणणे, प्रवेश करणे आणि पाहणे—ह्या तीन गोष्टी होतात. कारण एकदेशीयमध्ये एकदेशीयता असते आणि समग्रामध्ये समग्रता असते.

***संबंध***—*आता भगवान् अनन्यभक्तीच्या साधनांचे वर्णन करत आहेत.*

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव॥५५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पाण्डव** | = हे पांडव! | **मद्भक्तः** | = माझाच प्रेमी-भक्त आहे (तसेच) | **सर्वभूतेषु** | = संपूर्ण प्राण्यांशी |
| **यः** | = जो | | | **निर्वैरः** | = वैरभावरहित आहे, |
| **मत्कर्मकृत्** | = माझ्यासाठीच कर्म करणारा | **सङ्ग वर्जितः** | = सर्वथा आसक्ति-रहित (आणि) | **सः (एव)** | = तोच भक्त |
| | | | | **माम्** | = मला |
| **मत्परमः** | = मत्परायण (आणि) | | | **एति** | = प्राप्त होतो. |

***व्याख्या***— [या श्लोकात पाच गोष्टी आल्या आहेत. या पाचांना "साधनपंचक" ही म्हणतात. या पाचांचे दोन भाग आहेत (१) भगवंताशी घनिष्ठता (२) संसाराशी संबंध-विच्छेद. पहिल्या विभागात "**मत्कर्मकृत्,**" "**मत्परमः**" आणि "**मद्भक्तः**" ह्या तीन गोष्टी आहेत आणि दुसऱ्या विभागात "**सङ्गवर्जितः**" आणि "**निर्वैरः सर्वभूतेषु**" या दोन गोष्टी आहेत.]

**मत्कर्मकृत्**—जो भक्त जप, कीर्तन, ध्यान, सत्संग, स्वाध्याय इत्यादी भगवत्संबंधी कर्मांना आणि वर्ण, आश्रम, देश, काल, परिस्थिती इत्यादीनुसार प्राप्त झालेल्या लौकिक कर्मांना केवळ माझ्यासाठीच अर्थात् माझ्या प्रसन्नतेसाठीच करत असतो तो "**मत्कर्मकृत्**" आहे.

वास्तविक पाहिले तर, कर्माची पारमार्थिक आणि लौकिक ही दोन बाह्यरूपे असतात, परंतु अंतःकरणात "सर्व कर्म केवळ भगवंतासाठीच करावयाची आहेत" असा एकच भाव राहत असतो, एकच उद्देश राहत असतो. तात्पर्य, भक्त हा शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीने जे कोणतेही कर्म करत असतो, ते सर्व भगवंतासाठीच करत असतो. कारण त्याच्याजवळ शरीर, मन, बुद्धी, इंद्रिये, योग्यता, करण्याचे सामर्थ्य, समज इत्यादी जे काही आहे ते सर्वचे सर्व भगवंताकडून मिळालेले आहे आणि भगवंताचेच आहे, तसेच तो स्वतःही भगवंताचाच असतो. तो तर केवळ भगवंताच्या प्रसन्नतेसाठी, भगवंताच्या आज्ञेनुसार, भगवंताकडून मिळालेल्या शक्तीने निमित्तमात्र बनून कार्य करत असतो. हेच त्याचे "**मत्कर्मकृत्**" होणे आहे.

**मत्परमः**—जो मलाच परमोत्कृष्ट समजून केवळ मत्परायण

राहत असतो, अर्थात् ज्याचे परम प्रापणीय, परम ध्येय, परम आश्रय केवळ मीच आहे, असा भक्त "**मत्परम:**" आहे.

**मद्भक्त:**—जो केवळ माझाच भक्त आहे, अर्थात् ज्याने माझ्याशी अटळ संबंध जोडला आहे की, "मी केवळ भगवंताचाच आहे तसेच मी इतर कोणाचाही नाही आणि इतर कोणीही माझे नाही." असा भाव राहिल्याने भगवंता-विषयी अतिशय प्रेम निर्माण होते, कारण जे आपले असते ते आपोआपच प्रिय लागू लागते. प्रेमाच्या जागृतीत आत्मीय-ताच मुख्य आहे.

तो भक्त सर्व देशात, सर्व काळात, संपूर्ण वस्तु-व्यक्तीत आणि आपल्या स्वत:त सदा-सर्वदा प्रभूला परिपूर्ण पाहत असतो. या दृष्टीने प्रभू सर्व देशात असल्याने इथेही आहेत, सर्वकालात असल्याने आत्ताही आहेत, संपूर्ण वस्तु-व्यक्तीत असल्याने माझ्यातही आहेत आणि सर्वांचे असल्याने माझेही आहेत—असा भाव ठेवणाराच "**मद्भक्त:**" आहे.

**सङ्गवर्जित: निर्वैर: सर्वभूतेषु य:**—केवळ भगवंता-साठीच कर्म केल्याने, केवळ भगवत्परायण झाल्याने आणि केवळ भगवंताचा भक्त बनल्याने काय होते ? याचे उपर्युक्त पदांनी वर्णन करतात की, तो "**सङ्गवर्जित:**" होत असतो अर्थात् त्याची संसारात आसक्ती, ममता आणि कामना राहत नाही. आसक्ती, ममता आणि कामनेनेच संसाराशी संबंध जडलेला असतो. भगवंतात अनन्यप्रेम होताच आसक्ती इत्यादीचा अत्यंत अभाव होतो.

दुसरी गोष्ट, जेव्हा भक्ताला "मी भगवंताचा अंश आहे" या वास्तविकतेचा अनुभव होतो, तेव्हा त्याचे भगवंताविषयी प्रेम जागृत होते. प्रेम जागृत झाल्याने आसक्ती-चा अत्यंत अभाव होतो. आसक्तीचा अत्यंत अभाव झाल्याने आणि सर्वत्र भगवद्भाव झाल्याने त्याच्या शरीराशी कोणी कितीही दुर्व्यवहार करो, मारपीट करो, त्याचे अनिष्ट करो, तरीही त्याच्या अंत:करणात अनिष्ट करणाराविषयी किंचिन्मात्रही वैरभाव उत्पन्न होत नाही. तो त्यात भगवंताचीच मर्जी, कृपा मानतो. अशा भक्तांना भगवंतांनी "**निर्वैर: सर्वभूतेषु**" म्हटले आहे.

"**सङ्गवर्जित:**" आणि "**निर्वैर: सर्वभूतेषु**" या दोन्हीचे वर्णन करण्याचे तात्पर्य, "त्याचा संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होतो" हे दाखविण्यात आहे. संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यावर स्वत:सिद्ध परमात्म्याची प्राप्ती होते.

**स मामेति**—असा तो माझा भक्त मलाच प्राप्त होतो. "**स मामेति**" यात तत्त्वाने जाणून घेणे, दर्शन करणे आणि प्राप्त होणे या तिन्हीही गोष्टी येतात, जे पूर्वी (चौपन्नाव्या) श्लोकात सांगितले गेले आहे. तात्पर्य, ज्या उद्देशाने मनुष्यजन्म मिळाला आहे, तो उद्देश संपूर्णपणे पूर्ण होतो.

## विशेष गोष्ट

श्रीभगवंतांनी नवव्या अध्यायाच्या शेवटी म्हटले होते—

**"मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण:"॥**

(९।३४) असे म्हटले तरीही, भगवंताच्या मनात ही गोष्ट राहून गेली की, मी आपल्या रहस्याचे तत्त्व कशा प्रकाराने, कोण्या रीतीने समजावून देऊ? हेच समजून देण्यासाठी भगवंतांनी दहावा आणि अकरावा अध्याय सांगितला आहे.

जीवाने उत्पत्ति-विनाशशील आणि नित्य परिवर्तनशील प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर-संसाराचा आश्रय घेतला आहे, ज्यामुळे तो ह्या अविनाशी आणि नित्य अपरिवर्तनशील भगवंतापासून विमुख होत आहे. या विमुखतेला समाप्त करून जीवाला भगवंताच्या सम्मुख करण्यातच ह्या दोन्ही—दहाव्या आणि अकराव्या अध्यायाचे तात्पर्य आहे.

या मनुष्याजवळ दोन शक्ती आहेत. चिंतन करण्याची आणि पाहण्याची! यापैकी चिंतन करण्याची जी शक्ती आहे, तिला भगवंताच्या विभूतीत लावले पाहिजे. तात्पर्य, ज्या कोण्या वस्तू, व्यक्ती इत्यादीत जी काही विशेषता, महत्ता, विलक्षणता, अलौकिकता दिसेल आणि त्याकडे मन धावेल, त्यावेळी त्या विशेषता इत्यादीना भगवंताचीच समजून त्या ठिकाणी भगवंताचेच चिंतन झाले पाहिजे. यासाठी भगवंतांनी दहावा अध्याय सांगितला आहे.

दुसरी जी पाहण्याची शक्ती आहे, ती सर्व ठिकाणी भगवंत पाहण्यात लावली पाहिजे. तात्पर्य, ज्याप्रमाणे भगवंताच्या दिव्य अविनाशी विराट स्वरूपात अनेक रूपे आहेत, अनेक आकृती आहेत, अनेक प्रकारची दृश्य आहेत, त्याचप्रमाणे हा संसारही त्या विराटरूपाचेच एक अंग आहे आणि त्यात अनेक नाम, रूप, आकृती इत्यादीच्या रूपात परमात्माच परमात्मा परिपूर्ण आहे. त्या दृष्टीने सर्वांना परमात्मस्वरूप पहावे. यासाठी भगवंतांनी अकरावा अध्याय सांगितला आहे.

अर्जुनानेही ह्या दोन्ही दृष्टीसाठी दोन वेळा प्रार्थना केली आहे. दहाव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले आहे की, "हे भगवंत! मी कोण कोणत्या भावात आपले चिंतन करू?" त्यावेळी भगवंतांनी चिंतनाची शक्ती लावण्यासाठी आपल्या विभूतींचे वर्णन केले. अकराव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने म्हटले की, "मी

आपल्या रूपाला पाहू इच्छितो'' त्यावेळी भगवंतांनी आपले विश्वरूप दाखविले आणि त्याला पाहण्यासाठी अर्जुनाला दिव्यचक्षू दिले.

तात्पर्य, साधकाने आपल्या चिंतन आणि दर्शन शक्तीला भगवंताशिवाय दुसऱ्या कोण्याच ठिकाणी लावता कामा नये. अर्थात् साधकाने चिंतन करायचे असेल तर परमात्म्याचेच चिंतन करावे आणि ज्या कोणाला पहायचे असेल त्याला परमात्मस्वरूपच पहावे.

**परिशिष्ट भाव**—ज्या भक्तीने भगवान् चतुर्भुजरूपाने पाहिले जाऊ शकतात, त्या भक्तीचे स्वरूप स्पष्ट करतात की, मनुष्याने संसाराशी संबंध-विच्छेद करुन. संपूर्णपणे मला शरण व्हाते. '**मत्कर्मकृत्**'—हे स्थूल शरीराने भगवत्परायण होणे आहे, '**मत्परमः**'—हे सूक्ष्म आणि कारणशरीराने भगवत्परायण होणे आहे आणि '**मद्भक्तः**'—हे स्वजे भगवत्परायण होणे आहे. कारण 'मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत'—ही स्वची स्वीकृती असते.

'**स मामेति**'—पदांनी समग्राची प्राप्ती सांगितली गेली आहे.

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥***

**अशा प्रकारे ॐ तत्, सत् ह्या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या व योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात ''विश्वरूपदर्शनयोग'' नावाचा अकरावा अध्याय पूर्ण झाला. ॥ ११ ॥**

अर्जुनाने भगवंताकडून दिव्यदृष्टी प्राप्त करून त्यांच्या ज्या विश्वरूपाचे दर्शन केले होते, त्याच्या वर्णनाला वाचून-ऐकून, भगवंताच्या प्रभावाला समजून घेतल्याने भगवंताशी योगाचा (संबंधाचा) अनुभव येतो, म्हणून अकराव्या अध्यायाचे नाव ''विश्वरूपदर्शनयोग'' आहे.

## अकराव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात ''**अथैकादशोऽध्यायः**'' ची तीन, ''**अर्जुन उवाच**'' इत्यादी पदांची बावीस, श्लोकांची आठशे एक्कावन्न आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग आठशे एकोणनव्वद आहे.

(२) ''**अथैकादशोऽध्यायः**'' ची सात, ''**अर्जुन उवाच**'' इत्यादी पदांची सत्तर, श्लोकांची दोन हजार एकशे त्र्याण्णव आणि पुष्पिकेची पन्नास अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग दोन हजार तीनशे वीस आहे. या अध्यायाच्या पंचावन्न श्लोकांपैकी पहिला श्लोक तेहतीस अक्षरांचा आणि पंधराव्यापासून पन्नासाव्या श्लोकापर्यंतचे छत्तीस श्लोक चौवेचाळीस अक्षरांचे आहेत. बाकीचे अठरा श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात अकरा ''**उवाच**'' आहेत. चार ''**अर्जुन उवाच**'', चार ''**श्रीभगवानुवाच**'', आणि तीन ''**संजय उवाच**'' आहेत.

## अकराव्या अध्यायाचे प्रयुक्त छन्द

या अध्यायात पंचावन्न श्लोक आहेत. त्यापैकी एकोणीस श्लोक ''**अनुष्टुप्**'' छन्दाचे, तीन श्लोक ''**उपेन्द्र-वज्रा**'' छन्दाचे आणि तेहतीस श्लोक ''**उपजाति**'' छन्दाचे आहेत.

''**अनुष्टुप्**'' छन्दाच्या एकोणीस श्लोकांपैकी पहिल्या आणि पंचावन्नाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात ''भगण'' प्रयुक्त असल्याने ''**भ-विपुला**'', अकराव्या आणि त्रेपन्नाव्या श्लोकांच्या प्रथम चरणात ''नगण'' प्रयुक्त असल्याने ''**न-विपुला**'' आणि दहाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात ''नगण'' तसेच तृतीय चरणात ''भगण'' प्रयुक्त असल्याने ''**संकीर्ण-विपुला**'' छन्दाचे श्लोक आहेत. बाकीचे चौदा (२ ते ९,१२ ते १४, ५१,५२,५४) श्लोक ठीक ''**पथ्यावक्त्र**'' अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांने युक्त आहेत.

बाकीच्या छत्तीस श्लोकांपैकी अठ्ठावीसावा, एकोण-तीसावा आणि पंचेचाळीसावा श्लोक ''**उपेन्द्र वज्रा**'' तसेच शिल्लक राहिलेले तेहतीस (१५ ते २७,३० ते ४४,४६ ते ५०) श्लोक ठीक ''**उपजाति**'' छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.